ण्णूके तो पिछे लगा मायाका तो धंदा ॥ खेळ करे तो फसल पडा मिठी लगी बृंदा ॥ २ ॥ महादेव बडादेव सब देवनके बाबा ॥ भिल्लणीके पिछे लगे करी तोबा तोबा ॥ ३ ॥ विश्वामित्र तप करे बडा भयो ग्यानी ॥ मेनिकेनें गांड मारी होय धूळधानी ॥ ४ ॥ नारदोनें एक औरत कि-सन पास मंगी ॥ मरदोके जब अस्त्री भये बच्चे जनन लगी ॥ ५ ॥ हनूमान ब्रह्मचारी कहता रामनाम ॥ स्त्री राजामों औरत गाभनी किया होगये बेफाम ॥ ६ ॥ अहिल्लेकूं देखनमों इंद्र मर्दं भूला ॥ गौतमनें श्राप दिया सबी आंग फूला ॥ ७ ॥ जनार्दन सांई मेरा सबी खेलखेला ॥ एकनाथ भांड होकर उनके चरन मिला ॥ ८ ॥

मुंडा ह्मणतो—अरेरे पटेल गधी छोड देव.

पा०—अरे पाटिलच गधी की काय ?

मुं०—नहीं जी, तुह्मारे खेतरमें हमारी गधी आयगी तो छोड देव. पा०—बरें पण तुह्मी कोण ? मुं०—हम मुंडे हैं.

पा०—तुह्मांस कांहीं गाणें येतें काय? मुं०—हां आता है. पा०—बरें तर बोला पाहूं. मुं०—अच्छा, सुनो.

# पद २ रें.

॥ आल्ला तोही तोहीरे ॥ नबी तोही तोहीरे ॥ ॥ ध्रु० ॥ हमही मुंडा तुमही मुंडा मुंडा तेरा बाप॥ तेरे बापनें गद्धी चोदी हमकूं लगा पाप ॥ १ ॥ बगलम्याने तबलबाजे घरमें नहीं कोई ॥ खाली हांडीमें चुवा बजावे नाचन लागे डोई ॥२॥ सब देवनमें ब्रह्मा बडा पढत चारी बेद ॥ सरस्वतीके पीछे लगा ब्रह्मा बेटीचोद ॥ ३ ॥ ढवळगिरी पर्वत म्याने शंभु कर्तातप ॥ भिल्लिणिकां गांठ पडी तप हुआ गप ॥ ४॥पाराशरकी नुनी उठी ढिवरण लगी मीठी ॥ जमुनाका संग भयो व्यास व्यास कर उठी ॥ ५ ॥ नारद बडा जगद मारी औरत मागे दान ॥ साठ संवत्सर लडके किये होगये दानादान ॥ ६ ॥ गोकुलम्याने राज करत हे नाम रखा गिरधारी ॥ सोलासहस्र लवं-

ज्या चोदे होगये ब्रह्मचारी ॥ ७ ॥ मेरे साहेब उंच माडी कपडा धुवा न जाय॥ हातका साबन गिरगया तो फिर फिर गोते खाय ॥ ८ ॥ कपडा फाटे चमडा तूटे होगये सब यास ॥ एकाजनार्दनका बंदा दिनका दूरवेश ॥ ९ ॥

पाटील ह्म०—पुरे हें असें कसें तुमचें गाणें?

मुं०—हमरा गाणा ऐसाही होता है.

पा०—बरें तुह्मी एकटेच आहां कीं आणखी कोण आहे ?

मुं०—हमारे सात हमारा ताकां है.

पा०—तर त्यांस बोलवा. मुं०—नहीं तुम बुलाव. पा०—बरें त्यांचें नांव काय ? मु०—एकका नाम माजी और एकका नाम बेहणजी. पा०—( मोठ्यानें हांका मारतो) अरे माजी माजी होत. माजी [ दुरूनच मोठ्यानें उत्तर देते ] आजी बेटा क्या केहेता है ? पा०—अगे इकडे ये. माजी— अछा आवतीहूं. पा०—आजी बेहणजी बेहणजी होत. [ दुरूनच उत्तर देते] आजीं भय्या क्या केहता है ?

पा०—अगे इकडे ये. बे०—आछा आवतीहूं.

( नंतर दोघीजणी नाचत नाचत येतात. )

पा०—अगे तुह्मी कोण? दोधी जणी ह्मणतात आह्मी

सौऱ्या. पा०—बरें तुह्मांस कांहीं गातां येतें ? सौ०—होय, येतें. पा०—बरें तर गा पाहूं?

( नंतर दोघी जणी नाचत नाचत खालील पदें गातात. )

## पद १ लें.

॥ सौरी झालें बाई, आतां नाहीं येथें कांहीं॥ ध्रु०॥ होउनि वेडी घाली फुगडी, गलोगलीं नाचे, गलोगलीं नाचे ॥ मागें पुढें रुंदावलें झालें गणोबाचें ॥ होउनि उघडी घाली फुगडी जाउनी राउळांत, जाउनी राउळांत ॥ संतसंग जाहल्यावरी पुरेल तुझा हेत ॥२॥ तुका ह्मणे सोरी झालें दादला मेला म्याला, दादला मेला म्याला ॥ संग नसतां पोरें झालीं काय सांगूं तुला ॥ ३ ॥

## पद २ रें.

॥ मी सुखाची कन्या झालें, वाढविली घरीं, वाढविली घरीं॥देखतां पाहतां उचलुनी नेली चोरीं, उचलुनी नेली चोरीं ॥ १ सौरी झालें बाई आतां करूंतरी काई, करूंतरीकाई ॥ ध्रु० ॥ नि-

सुकाचा पुत्र झाला जावा नणदा घरीं, जावा नणदा घरीं ॥ पाहतां देखतां उचलुन नेली चोरीं ॥ सौरी० ॥२॥ बारा सोळा मुलें झालीं आले सुना नातू, आले सुना नातू ॥ शक्ति सर्व निघून गेली कंबरे वरी हातू, कंबरे वरी हातू ॥ सौरी० ॥ ३ ॥ कैंची बहीण कैंची माय अंतकाळीं देखा, अंतकाळीं देखा ॥ निदानीचेवेळीं तुज देव मारी हाका, देव मारी हाका ॥ सौरी० ॥ ४ ॥ लेंकुरवाळी बाइल ह्मणे तोंड याचें झांका, तोंड याचें झांका ॥ एका जनार्दनीं दास विनवितो तुका, विनवितो तुका ॥ सौरी० ॥ ५ ॥

## पद ३ रें

॥सौरी झालें बाई आतां करूं गत काई, करूंगत काई ॥धृ०॥बसवी झालें बाई आतां भिन्नभेद नाहीं, भिन्नभेद नाहीं॥ १॥कासरा लावुन सासरा मारला दादला टाकुन आलें,दादला टाकुन आलें॥

आत्मलिंग पाहुनियां मगर मस्त झालें, मगर मस्त झालें ॥ सौरी० ॥ २ ॥ बांधुन बुचडा उघडा माथा विभूतीचा पट्टा, विभूतीचा पट्टा ॥ आला गेला ह्मटला नाहीं धरल्या चारी वाटा, धरल्या चारी वाटा ॥ सौरी० ॥ ३ ॥ उभी शिंदळ घाली गोंधळ हाची लाभ मोठा, हाची लाभ मोठा ॥ मागें पुढें पाहूं नका वेगें काम लाटा, वेगें काम लाटा ॥ सौरी० ॥ ४ ॥ लहान थोर म्हटला नाहीं जहालेंशी वेडी, जहालेंशी वेडी ॥ तुका ह्मणे बसवी जहालें परद्वार गोडी, परद्वार गोडी ॥ सौरी० ॥ ५ ॥

## पद ४ थें

॥ सौरी झालें बाई आतां करूं गत काई, करूं गत काई ॥ ध्रु० ॥ अटवें परतें निटवें झालें दिवा मागें सारा, दिवा मागें सारा ॥ हातां पायां टिपरी लागे भुंगळ घेती वारा, भुंगळ घेती वारा ॥

सौरी० ॥ १ ॥ भावर्थाचें झालें गेलें गेलें संतांपाशीं, गेलें संतांपाशीं ॥ ज्ञान डोर घेउन हातीं लिंग देह नाशी, लिंग देह नाशी ॥सौरी०॥ ॥ २ ॥ पांच गाथ तीन माचे त्यावर निजलें होतें, त्यावर निजलें होतें ॥ फटफटीत उजाडलें खाटलें पडलें रितें,खाटलें पडलें रितें॥सौरी० ॥ ३ ॥ कर्म नेणों धर्म नेणों नेणों आह्मी कांहीं, नेणों आह्मी कांहीं ॥ ज्ञान देव ह्मणे आह्मा येणें जाणें नाहीं, येणें जाणें नाहीं ॥ चाल माझ्या विठू आतां तुह्मी आह्मी भेटूं, तुह्मी आह्मी भेटूं ॥ सौरी० ॥ ४ ॥

पा०—पुरे हें तुमचें गाणें, सौ०—आह्मांस कांहीं देतां कीं नाहीं ? पा०—चला निघा, तुह्माला काय द्यावयाचें आहे.

( नंतर सर्व निघून जातात. )

---


पाटील
महार
सीपाई

# सोंग ९ वें.

## महाराचें.

( सीपाई, पाटील आणि महार. )

सीपाई, पटेल आबे वो पाटेल. पाटील—कोण आहे ? सी०—हम बाहादुरसिंग सीपाई—है. पा०—राम राम सीपाईबावा, कां आलेत ? सी०—ये बिगार उठानेकी है. पा०—बरें मी येसकरास बोलाविलों. सी०—जलदी बलाव. पा०अरे येसकर ? महार—जोहार मायबाप. पा०—चल लवकर सीपाई बोलाविती. म०—हा आलों, जोहार मायबाप. सीपाई०—अरे येसकर? म०—कोण आहे भाव्या? सी०—हमसे तेडी बात करताहै ? म०—तेरा बाप तुह्माला असत्याल. मला एक बाप आहे. सी०—अबे आंधीके ये बिगार आई, बोज्या उठाव. म०—बाबा आई विघडली तिचा बोज्या मी कसा उचलूं ? ( येथें हसण्यासारखी गम्मत करावी ) सी०—आबे अंधीके हें ओझें घेऊन च्याल. म०—बरें आहे. सीपाईबावा उचलूं लागा. सी०—लेव सीरपर. म०—पागोटें पडलें सीपाई बाबा. तुह्मी घ्या जरा, मीं पागोटें बांधितों. सी०—आबे नीचे रखो. म०—सीपाई बाबा घ्या जरा हेंग हाच पागोटें

बांधितों. सी०—जल्दी बंधो. म०—सीपाई बाबा मी पागोटें बांधतांना एक लावणी ह्मणूं? सी०—आबे आछी है ? म०—हे बाबा लई ग्वाडना ? सी०—भला बोलतो बोल. म०—सूर लावून ऐका सीपाई बाबा. [ येथें लावणी ह्मणून गम्मत करावी, आणि सीपाई भुलवून सर्व कपडे घ्यावे. ते महारानें आंगांत ल्यावे व सीपायास ओझें घेऊन जाण्यास सांगावें. ]

जोहार मायबाप जोहार, मी देहगांवींचा महार पार्वतीच्या गळ्याचा हार, ईश्वराचा सर्व शृंगार॥ कीजे मायबाप ॥ १॥ श्रुत करून सांगतों साचें, पैसे टाका माझ्या धन्याचे, बाकी ठकवूं नका त्याची ॥ कीजे मायबाप ॥ २ ॥ पैल हा मनाजी मोठा फितवेखोर, यानें लाविला थोर घोर, आवर बुद्धाई आपला पोर, नाहींतर धनी कोपेल॥ कीजे मायबाप ॥ ३॥ विकल्पजी शेटे सदाचीधान, पाहतात आपुलाची मान, जेव्हां तोंडावर बैसेल व्हान, तेव्हां डोळे पुसाल ॥ कीजे माय बाप॥४॥

वासनाईनें फितूर केला, घरचा भेद बाहेर नेला, हा विचार धन्यास जर कळला, धनी धरून नेईल ॥ कीजे मायबाप ॥ ५ ॥ तैशीच ही ममताई आवा, इनें लाविला उभा दावा, ती वोढील हाता पायाच्या सावा, मग थुंकाल ॥ कीजे मायबाप ॥ ६ ॥ निंदाई आवाचें तोंड मोठें, म्यां म्हटलें कोण बोलती नेटें, हाद टाकून कीजे माय० ॥ ७ ॥ आशा आवाचा खोटा चाळा, ज्यासीत्यासी घालिती डोळा, मागती नवतीचा गोळा, परी अंती जड जाईल ॥ कीजे मायबाप ॥ ८ ॥ हा देहपाटलाचा गांव ॥ पांच पंचविसांची वे गळालीच हाव, आणखी पन्नासांचें नांव, घेउन ॥ कीजे मायबाप ॥ ९ ॥

# सोंग १० वें.

## दिंडीगाण.

आह्मी निर्गुणपुरचे रहिवाशी दिंडिगावण ॥ चाललों तीर्थालागुन ज्ञान दिंडीखांद्याघेऊन॥धृ०॥मंदील आंगरखा विजार संगीन ॥हें भक्तीचें भूषण एक शमला दिला सोडून जीजी ॥ हे अलंकार दागिने दिले चढवून, गळ्यांत माळा घालून आह्मी गेलों आनंदानें जीजी ॥ १ ॥ आह्मीं प्रथम गेलों दिंडीरवनालागून॥ तेथें स्नान करून,केलें रुक्मिणीचें दर्शन जीजी ॥चाल॥ गंगा गोदावरी यमुना सरस्वती ॥ नर्मदा कावेरी गोमती त्या तीर्थातुन मिळती जीजी ॥तोड॥ बाराच्या अमळामध्यें भक्त येऊन॥गंध पुष्पें वाहून पूजिती आनंदानेंजीजी २ काय असेल खुबी आज बोला, सभेमती जीजी

बतावणी– अहो रामराम ! उ०–रामराम! प्र०–तुह्मी कोण? उ०–आह्मी दिंडीगाण. प्र०–आमच्या गांवचा दिंडीगाण आहे, तो मागूं देणार नाहीं. उ०–त्याच्या आमच्या विचारानें मागूं त्यास बोलवा. अरे पद्या पद्या ! उ०–कांरे लेका गद्या ! प्र०–अरे दिंडीगाण आलेत, लौकर ये. उ०–हा अलों. ( येतानां नक्कल ह्मणत येतो )

॥नक्कल॥तुह्मी दिंडीगाण ह्मणवितां राव मोठे गावण ॥ सांगा तुमच्या बापानें कोठें केलें गायन जीजी ॥ध्रु०॥ सवा हाताची दिंडी आले शिणगारून ॥ गांवांत फिरतां खातां जन भोंदून जीजी ॥ आलां उतरा पोषाक दिलें तुह्मा जिवदान ॥ दोनी हात जोडुनी तुह्मीं या मजला शरण जीजी॥ चाल ॥ हे नव्हे फुकाचें गाणें लागलें गाया ॥ येइना ताल सूर गातां झकमाराया जीजी ॥ पाटिल कुळकर्णी बसले आया बाया ॥ हीं दोन माकडें आलीं आह्मां जिंकाया जीजी ॥ तुह्मी दिंडिगाण ह्मणवितां राव आपगामती ॥ आज पडला प्रसंग होऊंद्या परझ ! ॥

अहो रामराम नाना रामराम ! प्र०–हें काय नाना पेटल्यासारखें ! उ०–अरे हे दिंडीगाण. यांणीं मोठ्या मोठ्या ठिकाणीं गायन करून पोषाक मिळविलेत. [ येथें गंमत करावी ] अहो रामराम ! रामराम प्र०–तुमच्या हातीं काय

आहे ? उ०—दिंडी. प्र०—हा दिंडी, तुह्मी कोठें जातां ? उ०—गांव मांगायास जातो. प्र०—मागूं देणार नाहीं, चवथाई घेईन उ०—हरेल तो देईल. प्र०—बरें ह्मणा पाहूं ?

## ॥ पद ॥

जयजयबानारायणाजीजीजी ॥ मायबापतूंबंधूसज्जनायना ॥ कायवर्णूबातुझीयागुणाजीजीजी ॥ केलें दंडवतचरणायेणा ॥ १ ॥ येथंजन्मासीकोणकोणआलेजीजीजी ॥ त्यानेंआपुलेंस्वहीतकेलें केलें जी ॥ सत्यसद्गुरूलाशरणगेले जीजी ॥ त्यानें येउनीस्वहीतकेलेंजी ॥ आतांहोयमाझ्यारामा॥२॥ एकजाणोनीनेणतेझालेजी ॥ देहममतेसीविसरोनीगेलेगेलेजी ॥ अवघेप्रपंचविलयानेलेजी ॥ देहें येउनसीणतोडीलेयेले ॥ होयमाझ्यारामा ॥३॥एक जाणोनीभोळाभावजीजीजी ॥ भूतमात्रादाखविला देवदेवजी ॥ आलाचिद्घनस्वयंमेवजीजीजी ॥ त्याचेचरणवंदीउद्धवउद्धवजी ॥ ४ ॥

नकल ॥ माझ्या हरभऱ्या नारायणाजीजीजी ॥ तुझा भाजून केला चणा चणा॥ध्रु०॥त्याला मेळवुन हळदी कालवाना जीजीजी ॥ याचे दोन चार फक्के मारानायेना ॥ वर तां-ब्या भर पाणी कां प्याना हो जीजीजी ॥ आतां हो० ॥

## ॥ पद. ॥

एकदालगजानिर्माणझालीजीजीजी ॥ तिनेंसृष्टीव-रसृष्टीकेलीकेली॥ब्रह्मादिकजिचींबाहुलीजीजीजी॥ अमरापुरीसजीणंघरंकेलींकेलींजीजी॥१॥तीआधीं-चवंध्याभलीजीजीजी ॥ पतिविणेंगर्भीणराहिली येलीजी॥पांचपंचविसपोरंव्यालीजीजीजी ॥ कोण बाईटह्मणेलतीलातीलाजी॥अवघेतिच्याचचाली-नेंचालाजीजीजी ॥ मगसुफलहोईलतुह्मालायेला जी ॥२॥ जोतियेसीशिवलानाहींजीजीजी ॥ व्या-लीपांचपंचविसदाहीदाही ॥ तिचीकरणीकांहींच नाहींजीजीजी ॥ रामदासह्मणेसुखपाईजी ॥ ४ ॥

॥ नकल ॥ जयजय तूं मटके बाई जीजी ॥ तुझी उसळ वा-

टते खावी खावी ॥ बाईला मिठ मिरची लावावी जीजी ॥ वर लसणाची फोडणी द्यावी द्यावी ॥ आतां हो० ॥

## पद.

देहदिंडीम्यांखांद्याघेतलीजीजीजी ॥ अनुसंधाना तारजोडीलीजी ॥ शुद्धसत्वाचीझोळीबांधिलीजी जी ॥ बोधविवेकटाळजोडकेलीयेली ॥ आतांहो० ॥ १ ॥ जयजयकावडखांद्याघेतलीजीजी ॥ दो नबरोबरसिंकीबांधिलीयेली ॥ दोनभांडींहीआंतठे विलींजीजी ॥ शुद्धपाणीभरूनआणीलेंयलेंजी ॥

## सोंग ११ वें.

### भाट.

मेहेरबान सलाम, बडे बडे सेट सौदागर, सावकार, हवाल- दार, जमेदार, सुभेदार, राजे रजवाडे; राजकुमार, भरसभा- मों गर्जत भाट भाट, गजघाट, साजे घोडेपर थाट, पीठपर् झिन जडावके जडे हैं, आंगमों सरमजाम जरद पीला, मके

बिच मोतनकी माला, अंगपर शाला दुशाला, शिरपेंचका झळाला. ऊपर चमक रही बाला, रामराजा देनेवाला, दातनको बोलबाला, ब्रह्मभाट बखान बोला, थरकत घोडा भडकत निशान, अठरा बरणके राज्य महाराज ! प्र०—तुम कोण हो ? उ०—हम निरंजनपुरके भाट हैं. प्र०—हमारेबी गांवका भाट है. उ०—उसे बुलाव. प्र०—तुमारे सब कपडे छीन लेगा. उ०—हमबी छप्पन देश जीतके आये हैं. उनकूं बुलाव. ॥ बतावणी ॥ अरे सरज्या सरज्या ! उ०—कारे लेका गिरज्या ! प्र०—अरे तुझ्या गांवांत भाट आला आहे लौकर ये. [ येथें गंमत करावी. ] गांवभाट ह्मणतो मोठ्यामोठ्या सभेमध्यें, मोठ्या सरदारांमध्यें, मोठ्या राज्यामध्यें, मोठ्या वाड्यामध्यें, नाना रामराम, कां बोलावणें केलें ? उ०— अरे भाट तुला जिंकायास आला आहे. प्र०—केंव पटेल येही तुह्मारे गांवका भाट ? येतो घेडसरीका दिखता है. उ०—ऐक घेडगीच्या- प्र०—आबे तूं हमारे जुबानसे जुबाब देयगा ? उ०—अरे तुझ्या जिबेला जीब कशी लावूं ? बाटवितोस काय लेका ? प्र०—आबे हमारे बाणीसो बाणी देयगा ? उ०—अरे ह्यावेळेस बाणी कोठें मिळेल ? प्र०—आबे हमारे उतारसे उतार देयगा उ०—नाना याला आजार झाला आहे ह्मणोन उतारा मागतो ! प्र०—ये दिवाना तो नहीं ? उ०—नाना हे दिवे लावले हात

जोबनकूं; श्रवण दिये सुनने खातर, दंत दिये मुख मंडनकूं; रसना दिई रस स्वादबि चाखे, हात दिये कुछ दानकूं ॥

॥ नक्कल ॥ आग दनानी, बाग दनानी, बागामध्यें चौधी जनी, हीरवे लिंबु कुंकवावानी.

॥ कवित्त ॥

छोटे छोटे हात, छोटे छोटे पाव, छोटे छोटे बाळ, गोविंद कन्हैया, नाग फना फन झुल रही पगरी पटको मुख चुंबन लियो, तेल फुलेल हमेल बनेल उंगलिपर टेकन चावत माय, पुनीत जेस्वदा माताकूं धिकटधा धिकटधी नाचत कन्हैया.

॥ नक्कल ॥ झुन झुन पाखुरा, हुंहुं! जा माझ्या माहेरा, हुंहुं! एवढा निरोप, हुंहुं ! सांग माझ्या आईला, हुंहुं ! गवरीच्या सनाला, हुंहुं ! ये मला नेयाला, हुंहुं ! ! !

॥ कवित्त ॥

दामसो देव विमान चढावत, दामसो दुर्जन दुर कर्यों, दामसे शेवक मान चढावत, जिनके गांठ

सफेत रुपयो, जोरु कहे मेरो प्राणपति है, बेहन कहे मेरो सुंदर भय्यो, माता कहे मेरो चातुरलड-को, जबलग गांठ सफेत रुपयो.

॥ नक्कल ॥ पाण्यापेक्षां पातळ विषापेक्षां कडू, माझा उखाणा जिंकेल त्याला देईन सोन्याचा गडू ॥

## ॥ कवित्त ॥

आनेकी बाट कोण, जानेका घाट कोण, ब्रह्मका कपाट कोण, कहांसे जीव आयाहै. जीव कोण, शिव कोण, शिवका स्वरूप कोण, माया कोण धरणी कोण, धरनीकूं धरे कोण, सबनमों ज्यागे कोण, देह छेके भागे कोण, कौणमों कोण समाया है. कहे निपट निरंजन येतना बुजे नहींतो झकमारन नरदेह पाया है.

॥ नक्कल ॥ वांकडी तिकडी बाबळ, त्यावर बसला होला, येथून मारला टोला, तर गंगे पार गेला ॥

# सोंग १२ वें.

## जोशी.

भविष्य ऐका दादानु रे बाबानु,ऐका माझ्या दादानु॥ध्रु०॥पंचविसांचा हा देह बा हा देह,पंचविसा०॥साधन बंधन साधावें बा साधावें,सा०॥धरून नटसि हादेह बा हा देह ध०॥१॥आले संचित फलासीबा,फलासी०॥तो नर नये देहासी बा,देहासी तो नर०॥ तृतीय ग्रह तुजपाशीं बा,तुजपाशीं,तृतिय०॥तेतुज करतिल परदेशी बा परदेशी,ते तुज० ॥२॥ त्रिगूण पंचक विषयाचें बा विषयाचें, त्रिगूण पं० ॥ थोर थोराला भय त्याचें बा,भय त्याचें ॥ थोर थो० ॥दहा रासी हें बळत्याचें बा, बळ त्याचें,दहारा०॥अकरावें हें स्थळ त्याचें बा,स्थळ त्याचें,अ०॥भवि॥३॥रात्री सहित दिनमान बा,दिनमाना॥रात्रि०॥अटतील हे त्रिभुवन बा,त्रिभुवन,अट०

॥ जरि तुज आपुलें हितकरणें बा,हितकरणें,ज०॥ सद्गुरु चरण दृढ धरणें बा०॥४॥कडका मोठा होई-लबा होईल॥कडका मो०॥काळ जगातें खाइल बा खाईल,काळ०॥जळस्थळ अवघें जाईल बा, जाई-ल,जळ०॥निवांत होऊन राहील बा,राहील, नि-वांत०॥भविष्यऐ०॥५॥कृष्णरायाचा प्रभु जोशी-बा,प्रभु जोशी, कृष्ण०॥ सर्वही वस्तु त्यापाशीं बा, त्यापाशीं,सर्व०॥क्षणांत ही त्रिभुवनासी बा, त्रिभुवनासी, क्षणांत०॥ सुखभोगी मूळ मिरासी बा, मिरासी, सुख०॥ भविष्यऐका०॥

॥ नक्कल ॥हेंचभविष्यखरेरबाखरेरबा, हेंच०॥ चुलीलाआग लागेलरेबा,लागेल॥चुली०॥ पाटावरवंटा भांडेलरेबा, भांडेल पाटा०॥ उखळांतमुसळपडेलरेबा, पडेल उख०॥ घरांत इड्या दारांत सीड्या बायका विड्या ओढतीलबा ओढतील॥हेंचभ-विष्य०॥ हतेरांत माडु जेवनांत लाडु सेजारीं साडु असावा बा असावा॥हेंचभवि०॥ तुळकी वहाण जावई लहान नसावा बा नसावा हेंचभवि०॥

# दोहा

यारे या जाग्यामध्यें ब्रम्हराक्षस नांदतो त्या राक्ष-
सानें पंचभूतें केलीं पांचापासोनी पंचवीस झालीं,
ते एके ठायीं मिळालीं तें ऐका गा रायानों ॥१॥
त्यापंचविसानें देहे धुंडिली बाब्राचा जीव तोंडी
घातिला साचन करा तयाला, पांच जिनसांची
झाडनी करा गा रायानों ॥ २ ॥ आधीं झाडनी
अन्नाची करा, दुसरी झाडनी मनपुरीची करा, ति-
सरी झाडनी स्नेहाची करा, हा एक बिचार बरा
सांगतों गा रायानों ॥ ३ ॥ चवथी झाडनी
सुखशेयाची करा, पंचक्रोंसी हा विचार बरा, त्रिवे-
णीचासंगम खरा, वेद बोलतो गा रायानों ॥ ४ ॥

बातावणी प्र०—बये आपलें नांव काय? उ०—साळू प्र०—आप-
ली कुंभरास आहे, पंदा मोठा लाभ होईल. बये, आपले पती
कोठें गेलेत? उ०—चाकरीस. प्र०—ते खुशाल आहेत. आपणा-
स काय भावना होती बये ? उ०—कपाळ दुखतें. प्र०—बि—

जवरा मिळेल. ( नक्कल कुंकू पुसून गंध लावा ) प्र०—आपाखी काय भावना होती बये? उ०—गळा खाजवतो. प्र०—यंदा सोन्याची सरी मिळेल ( नक्कल गळ्यांत दोरी बांधा ) प्र०—आपाखी काय भावना होती बये ? उ०—नाक सिवसिवतें प्र०—सरज्याची नथ मिळेल ( नक्कल नाक कापून टाका ) प्र०—आपाखी काय भावना होती बये ? उ०—हात वळतात प्र०—यंदा बाजुबंद मिळतील ( नक्कल मुसक्या बांधतील. ) प्र०—आपाखी काय भावना होती बये? उ०—पाय फुटतात. प्र०—शिंदेशाई तोडे मिळतील ( नक्कल बेड्या पडतील. )

बतावणी—राम राम नाना आपलें नाव काय ? उ०—रामचंद्र. प्र०—क्रूरे रोता स्वाती विशाखा त्रयस्तूलः तूळरास आपली आली आहे. नाना प्रथम मी एक सांगतों. नगरांत झगडे होतील ! गरतीच्या बटकी होतील ! बोडक्या गरोदर राहतील ! महाराणी मेण्यांत बैसतील ! त्वरा फार होईल नाना. अविचार निघतील ! परजन्य वरसाव टाकील नाना. पर शालू मालूच्या गमवार्वी तांब्याचा कोट, शिशाची वाख, आंत नागार्जुन पैदा होईल, होत्या नव्हते होईल, चक्रीग्रहण लागेल, परंतु तुझ्या राशीस ग्रह मोठा कठीण आला आहे नाना. तो कसा जर ह्मणशील तर वर्जवार गुरुवार वर्ण तो मृगाचा, गुण तो राक्षसाचा, शनी तो पाई आला आहे नाना.

बृहस्पती तो पांचवा, केतु तो सहावा, मंगळ तो सातवा आला आहे नाना. शनवारीं हजामत करूं नको, तोंड धुवून न्याहरी करूं नको, आंग धुवून जेऊं नको, संध्याकाळीं पागोटें बांधूं नको, घात तुझा होईल नाना. भर तीनसांजे द्वारांत उभा राहूं नको. आंगावर मळकें वस्त्र घेऊं नको, मागल्या आळीस जेवाया जाऊं नको, घात तुझा होईल नाना. डोळ्यांत तो क्रोध आहे, गर-दन तो मेंडा आहे, कपाळ तो उंच आहे, पैसा फार मिळेल नाना. ऊर तो मोठा आहे, माथा तो टिळा आहे, हातावर तो धनरेषा आहे, लाभ मोठा होईल नाना. आंगावर तो केश आहेत, बोटावर चक्र आहे, आंग तो काळा आहे, तोंडा-चा बडबड्या, पोटांत तो कपट नाहीं नाना. माहेपौर्णिमेपा-सून फाल्गुन पौर्णिमेपर्यंत गोलहाटा होऊन एकच बोंब होईल नाना ! परंतु या ग्रहाचें घर बंधन कर. मी सांगतों तें जीवीं धर. तोळाभर सुवर्ण, तोळाभर चांदी, तोळाभर तांबें, समधात करून त्याची मूहूर्त कर. शेरभर तेलाचा अभिषेक कर. सात त्रिबवे, एक खोबऱ्याची वाटी, तोळाभर शेंदूर दे. मी चिंतामण जोशी दाढेखालीं रगडून टाकीन, आपला ग्रह आपल्या पायातळीं घालीन नाना. परंतु एक पूर्वेस कों-बडा कोकतो, पश्चमेस मोर घुमतो, दक्षणेस गाढव भुकतो,

उत्तरेस बैल डरकतो नाना. शिराचा ग्रह मुक्तीस आला. मुक्तीचा ग्रह गळ्यांत आला, गळ्यांतचा ग्रह उरांत आला, उराचा ग्रह पोटांत आला, पोटाचा ग्रह कमरेंत आला, आंगठ्याचा ग्रह पायांत आला, दोनी ग्रह एक झाले, नावा वरती इटपावले हे कधीं निघेनात, काढ ह्मणशील तर काढतों. विघ्न मात्र दूर करितों नाना. कलयुग आलें उफराटें, द्वारीं कुंजर झुलतील, उंटांचे कतारे लागतील, शेळ्यामेंढ्यांचा रगडा पडेल, गाई ह्मैशीनें वाडा भरेल, घोड्यांच्या पागा लागतील, शिरीं मंदील, कानांत चौकडा, तुझें महत्व फार वाढेल नाना. बारा भोयांची पालखी तुझ्या द्वारांत येईल. [ नक्कल चार भोयांची येईल ] प्र०—तिघी बटकी तुझ्या सेवेस लागतील, परंतु नाना एक बायको तुझ्या बळेंच गळां पडेल. ती कशी जर ह्मणशील तर काळ्या दातांची ! बाबऱ्या ओंठाची ! चिपड्या डोळ्यांची ! मडक्या येवढ्या डोक्याची ! घागरी येवढ्या पोटाची! पायांत फेंगडी, कंबरेंत कुबडी, कानांत खोरी, ह्या रीतीची बायको तुझ्या गळ्यांत पडेल. परंतु तिच्या पायीं दौलत फार वाढेल नाना. [ नक्कल तिच्यापायीं दवलत जाईल. ] प्र०—प्रथम पूजा ईश्वराची. [ नक्कल प्रथम पूजा देहाची. ] प्र०—बहु कृपा पार्वतीची. [ नक्कल बहु कृपा आईची. ] प्र०—नांदणूक अमरावतीची, कळा चंद्राची, सभा

त्या इंद्राची [ नक्कल सभा त्या उंद्रांची ] प्र०—शृंगार गौरीचा, स्वर कोकिळेचा, अंत समुद्राचा, नाद शंखाचा. [ नक्कल नाद त्या पादाचा. ] प्र०—गायन सरस्वतीचें, पाणी गंगेचें, रूप त्या रंभेचें. [ नक्कल रूप त्या नकटीचें. ] प्र०—अढळपद ध्रुवाचें, चांगुलपण नकुळाचें, संधान अर्जुनाचें, सत्य बोलणें राया धर्माचें, बंधुपण लक्ष्मणाचें, पुत्रपण श्रावणाचें, उदारत्व कर्णाचें, व्रत एकादशीचें, एक यात्रा पंढरपुरची [ नक्कल यात्रा रानशीचीं. ] प्र०—सांगड भोपळ्यांची, पोहोणार नदीचा, कोप ढालीचा, मनसुबा त्या प्रधानाचा, उडी चित्याची, दृष्टी कागाची, मिठी वाघाची, चावडी ग्रामाची, कचेरी राजाची, राजानें राज्य करावें, न्यां चिंतामण जोशानें ज्योतीष सांगावें; पर ह्या अरसअंत पागोटें द्यावें नाना.

## पद.

मी आलों रायाचा जोशी होरा ऐकशी ॥ धृ० ॥
कल्पना बायको शेजारीण, झगडाकरी मोठादारुण, ॥तिच्या पाई होईल नागवण, घर बुडवीसी ॥१॥
मी आ० ॥ मनाजीपाटील देहेगांवींचा, विश्वास धरुं नका तयाचा ॥ घातहोइलरे नेमाचा, सत्यमा

नीसी ॥२॥ मीआ० ॥ येथूनपुढें बरेंहोईल, भक्ति सुखें दोंदवाढेल॥बेडीकर्मांची तुटेल, सत्यमानीसी ॥३॥पुढें काळसंनिध ठेला, माय धरीना लेंकराला ॥ एकाजनार्दनीं श्रोत्याला, झणी विसरसी ॥४॥

## सोंग १२ वें.

## तुंबडीवाले.

आवल एक निराकार मेरी तुंमडी भरदे, मोहमायाका विस्तार मेरी तुंमडी भरदे, जनीं ब्रह्मा विष्णु रुद्र मेरी तुं० भये दशअवतार मेरी तुंब० छे दरशनका पुन मेरी तुं० एकै बीजका विस्तार मेरी तुं० ब्रह्माकरे आकार मेरी तुं० बोले रामानंदलाल मेरी तुंब० तुंबडी भरदे, लाल तुंबडी- भरदे० नानासाहेबकी जय मेरी तुंबडी भरदे, पाटीलबुवा पट्टी करा तुंबडी भरून द्या. कुळकर्णी कलम धरा तुंबडी० उठा उठा पोतदार तुंबडी० गुरवा सांगे नेसकरा तुं० बा० रावळुवे एकघरा तुंबडी० तुह्मा विनवितों ल्हान थोरां तुं० आईबाई मिळून माझी तुंबडी भरून द्या, लाडाई गोडाई

## तुंबडीवाले



दलुन माझी तुंबडी० उगाच बसून राहूं नका तुंब० टक-मका पाहूं नका तुं० ॥१॥ चाल ॥ उठ मेरे नाना, मुजे दक्षघर-जाना, मेरी तुंबडी भरदे, लाल तुंबडी भरदे. उठ मेरीताई, और भंगनकी धाई, मेरी तुं० चार मिले घाटी, खाते बाजरीकी रोटी, लिई हेलोंकी पांटी, मेरी तुंबडी भर० चार मिले कसाई उने सब बात फसाई, मेरी तुं० चार मिले भट, करे कढी-भात चट, दक्षणामंगे झटपट, मेरी तुंबडीभर० चार मिले साळी, बात अछी निकाली, मेरी तुंबडी भर० चार मिले बंमन, व्हां बातोंकी लम्बन, मेरी तुंबडी० चार मिले सोनार, सो बात नहीं होनार! मेरी तुंबडी० चार मिले गवंडी, व्हा बातों-की दवंडी, मेरी तुंबडी० चार मिले कोळी, उने लंगो-टी डाली, बोले अवार तवार बोली, मेरी० आगरी मिले चार, करे चुनेका वेपार, किया मिठका आगर, निमकपके झराझर! मेरी तुंबडी० चार मिले भंडारी, रखे कानोपर पगडी, बेचे दारू और ताडी, मेरी तुंबडी० चार मिले दरजी, व्हां बात हुई गरजी, मेरी तुंब० काशी माईको पुन मेरी तुंबडी०धनकधारीको पुन मेरी० ॥ २ ॥ चाल ॥ वाहवा हालवाई हालवाई, तेरी तेलकी मिठाई, सब छोकरेनें खाई, मेरी० दमडीका बेर, मुजे जाना है दूर, कोश बारोका फेर, व्हां फुलोंका शेर, मेरी० श्रीकृष्ण मोहनलाल,

बडा देवकीका बाल, गळां वैजयंती माळ, राधा भई खुशाल. मेरी० दमडीकी राई, सासवहूकी लढाई, आधि रोटी चुराई, उने बैठकर खाई, उसे शरम नहीं आई; मेरी० गोरे गोरे अंग, पाहुन किती होसिल दंग, तापत्याच्या चोळीवर कुसुंबी रंग, मेरी० ॥ चाल ॥ आया बाया मिळून माझें लग्न करून द्या. मेरी० मोठेमोठे लोक माझ्या लग्नाला या, मेरी० पांचजनी सवासनी करवल्या व्हा, मेरी० ह्यातान्या कोतान्या माझ्या वरमाया व्हा, मेरी० दशमीची हळदी और पंचमीचें लग्न, माझ्या लग्नाला या, आणा भट ब्राह्मण माझें लग्न लावून द्या! मेरी० पेशव्याची फौज माझ्या लग्नाला द्या मेरी० काठेवाडी घोडा मला बसायाला द्या, मेरी० सहा मण हळद माझ्या लग्नाला द्या! मेरी० काजळ द्या गाडीभरून माझें लग्न करून द्या! मेरी तुंबडी भरदे तुंबडी० भरगच्ची मंदील मला बांधायला द्या! तुंब० जरी पटका शाल माझ्या अंगावर द्या! मेरी तुंबडी० तापत्याची चोळी माझ्या बायकोला द्या, तुं० पैठणी साडी तिला नेसायला द्या, तुंब० चला एखादे गांवीं माझें लग्न करून द्या! तुंबडी भरदे तुंबडी भरदे धनकधारीको पुन मेरी तुंबडी भरदे० ॥ ३ ॥ हल्ली सिक्का, वाई सिक्का, पुणेंसिक्का; द्या. मद्रासी अंकुसी, चिंचोडी द्या. बेलापुरी भातोडी, वाफगावी द्या.

मल्हारशाई, बाबाशाई, मकनशाई, वल्लभशाई, घोपशाई, कछे कोरी, घा. मानशाई, जामशाई, समशेरी, घा. प्रतापगडी जाइनगरी, नांदगिरी, घा. तुंबडी भरदे लाल० ॥

## कटाव.

तुंबडीवाले गुरु समर्थ, कोईनइ हमारेसात, भजन करे दिनरात, बाबातुंबडीभरदे० ॥ १ ॥ सुरत जाइगी, सरदी होइगी, होजायगी गरदी, बाबा तुंबडीभरदे० ॥२॥ क्या कहेते है खासा, जैसा थिल्लरका मासा, काल डालेगा फांसा, मेरी० ॥ ३ ॥ अभीमानकी गाठ, फेर पडेगा फाट, लेवो हरिनाम मीठा, मेरी तुंबडीभरदे० ॥ ४ ॥ क्या कहता है गडबड, हो ज्यागी सडबड, आब छोड दे गडबड, मेरीतुं०॥५॥क्या कहताहै ग्यान, बाचै पोथीपुराण, साधुब्रह्माको ध्यान, मेरीतुं० ॥ ६ ॥ फेर आनेका नहीं, तेरे हाथ कुच नहीं, बाबातुं० ॥ ७ ॥ कहे धायाजीका पूत, नाम रामजी प्रख्यात, हाय आगरीकी जात, उसे प्रसन्न गुरुनाथ, मेरी० ॥

# सोंग १३ वें.

## परदेशाचें.

ले ज्यारे पिया लेज्या, पिया ले ज्या बेदरदीहो, तरवार मारु, मखिन तोरु, तोरु कच्यासूत ॥ सौ बुकीसे पापर तोरु, बरेसिपाई रजपूत, हामतो बरे सिपाईके लरके, कोकनकी नार पेन्हे सोला हात सारी, आधि आंग उघारी, परदेस मिलाई मनहट- की, घर खोगई रखोगई. दखनकी बटकी, पिया लेज्यारे मोहे लेज्या बेदरदीहो ! बिटवा तोरी ह्मातारी देखै बरतन बज्यावे, बुढवा वय वय बरतन बजावे, बुढवा साममें पांडे दौरके आये, नाम रखाया कुतवा वय बयना० लेज्यारे पिया लेज्या [ बतावणी ] प्र०—राम राम हो भय्याजी राम राम. उ०—थूतू त्वारे बिटवाका ज्वान ऐसी राम राम करत रह्यारे. प्र०—तर कसी करावी ? उ०—ज्वान हमारे मुलुखमें कैसे राम राम करे ? प्र०—कसे बरे ? उ०—सब मजलस बैठे ज्वान भय्या राम राम होभय्या राम राम प्र०—महाराज, तुह्मी आला कोठून ? उ०—अरे हाम बरें लंबेसे आये. प्र०—कोठून ? उ० अरे हिंदुस्थान, अयोध्या, बनारसी, सातपूरासे आये. प्र०—तुम कौण रहेरे ? उ०—मी येथील पाटील. प्र०—ज्वान ये गांवका पट्टवारी रहे ? उ०—अहो मी मुकादम आहें. प्र०—

ज्वान कोण मोच्यादम रहेरे ? उ०—तुमच्या गांवामध्यें मोठा सुभेदार असतो, तसा मी येथे मोठा आहें. प्र०—हमारे गांवके सुभेदारका बिटवा रहेरे ? आरे ज्वान इस गांममों कोई गावणेवाला रहेरे ? उ०—आहे प्र०—बुलाव.

( चित्रकथ्या खालचें गाणें ह्मणत येतो. )

हरीचे तातडी, दामाशेटी गेला॥ नैवेद्य पाठविला, नाम्याहातीं ॥ नैवेद्य घेऊनी, राउळासि गेला ॥ हाका मारी त्याला, विठ्या विठ्या ॥ २ ॥ उठी बा लवकरी, जेंवि बा झडकरी॥ माता माझी घरीं, वाट पाहे ॥३॥ नेणता ह्मणुनी, कां रे जेविनासी ॥ करीन प्राणासी, घात माझ्या ॥ ४ ॥ पाषाणाची मूर्त, थरथरां कांपली ॥ जेऊं बा लागली, नाम्यासंगें ॥ ५ ॥ पाषाणाची मूर्त, नाम्यानें जेवविली ॥ जगीं कीर्ति झाली, जनी ह्मणे ॥ ६ ॥

॥ वतावणी ॥ नाना राम राम. कां बोलाविलें ? उ०—आपल्या गांवात एक परदेशी आला आहे, त्याच्याजवळ कांहीं गायन कर, तो तुला देणगी देईल. प्र०—नाना त्याचें

नांव काय ? उ०—रडशिंग जमादार. प्र०—ठीक. तोच रडतो मग मला काय देणार ? आणि त्याच्या बापाचें नांव ? उ०—पैजारशिंग प्र०—त्यानें कोठें तरी पैजार खाल्ले असतील ! उ०—अरे तुझी चीत्रकथ्याची जात तशीच ! चिमटिभर दाण्यासाठीं, डोंचकें फोडनार ! प्र०—खरें आमची जात जर एखाद्याच्या पाठीमागें एका पैशासाठीं लागली, तर पुण्यापासून आळंदीपर्यंत जाऊं, पण पैसा त्याच्या बापाला सोडणार नाहीं. बरें नाना तुमची जात कोण ? उ०—अरे आह्मीं सोनार. प्र०—हां ! उत्तम जात. नजरं गुंजुं, हस्तं वालं, बागेश्वरी मटलं, ठाकं ठोकं, परलोगतः उ०—ह्मणजे काय समजावें ? प्र०—नजरेनें पहातांच गुंजभर सोनें गेलें ! हातांत घेतांच वालभर तुमच्या बापाचेंच ! बागेश्वरींत गेलें ह्मणजे पार झालें ! उ०—अरे आमची उचापत काढण्याची काय जरूर ? प्र०—तुला चिमटीभर दाणें काढण्याची काय जरूर ? बरें ते यजमान कोठें आहेत ? उ०—ते पहा माणिकचौकांत. ( चि० ) अहो राम राम. ( परदेशी ) बागनमोरवाहो बागन-मोरवा.

## परदेशी.

बागनमोरवा हो बागनमोरवा, बोलेरे पिया बागन

मोरवा ॥ धृ० ॥ लिंबु ना तोरु नारंगी ना तोरु ॥ तोरु सिताफल दोरवा॥पिया बागन मोरवा ॥१॥

## ( आहो रामराम )

आहो राम राम महाराज. धूतात्व हारी बिटवा ज्वान ऐसी राम राम कर रहे, ज्वान हमारे मुलुखमों कैसी राम रहेरे? सब मजलस बैठे पंचो राम राम होभय्या राम राम. अरे तुम कोण रहेरे ? उ०—मी चित्रकथ्या आहें. प्र०—ज्वान चित्रगढियां रहेरे ? उ०—वाहवा अहो मी बोधल्या बावाचा शिष्य आहें. प्र०—कौण बोंबल्याबावा ? उ०—वाहवा ? प्र०—ज्वान कोण रहेरे ? उ०—नामदेवाचा शिष्य आहें. प्र०—हंः हंः ज्वान वो नामादरजी ठेंबरपुरके विठ्याको भक्त रहे वाको तुम शिष्या रहे ? उ०—आहो एक अभंग ऐका प्र०—कौणसा अभंग उ०—झाला भयाभंग आहो त्या बोधल्याबावानें ममताईच्या जीवासाठीं कसा शोक केला.

## ॥ अभंग ॥

चौघि माझ्या लेकी, चौघि माझ्या सूना॥पाणि मागूं कोणा, ममतेविण॥पाणि मागूं कोणा रामा०॥

[ धूततोरी ] नाना, पोट, पाठ, तोंड, डोकें, नाक. उ०—

आहो महाराज कथा ऐका, ज्यावेळेस राम लंकेस गेले. उ०—राम लंका भया, राम लंका भया. प्र०—झाला लंकाचा भयाभंग ! उ०—ज्वान कहदेव. प्र०—तेव्हां रावणानें सीता चोरून नेली, मग मारुती सीताशुद्धी घेऊन आले, नंतर राम वान्नर दल घेऊन लंकेस गेले. मग मोठी लढाई केली. उ ०—राम लंका भया. प्र०—मोठी लढाई झाली. उ०—बरी लढाई भई. प्र०—रावणाला वधून राज्य बिभीषणास दिलें उ०—बरी लढाई भई. प्र०—लढाई संपली मग राम लंकेहून निघाले सीता घेऊन अयोध्येस आले, मग जेवणावळी झाल्या. उ०—बरी लढाई भई. प्र०—अरे आतां लढाई संपली. उ०—जवान तूं आकेला रहेरे ? प्र०— आह्मी दोघें आहों. आग सज्जन ? उ०—जी; आलें. प्र०—ये कोणरे तोरी ? उ०—बया माझी बायको. प्र०—धूततोरी बीटवाको जवान बायकू लुगाई करत है ? ये साठ बरसकी बुढिया रहे अछी ज्वान बुलाव ? प्र०—आग हीरा,तारा.उ०—जीजी. प्र०—लवकर ये ? उ०—आलें. प्र०—होहो आवनारे ये शेरेपर बैठ,होहो क्या मजा होरही.आब एक अछी लावणी सुनाव [ आरगट परगट आलें सजना उभी मी केव्हांची ] ऐसी लावणी सुनावना. उ०—आहो महाराज कांहीं कथा ऐका. प्र०—कौण कथा सुनावना उ०— [ पोथी ] माझें पहिलें काय नमनवा हाहा सख्या रामा

रामा दाजी जी ! नमु गवरीचा कुमर बा, हा,हा स० चौदा विद्यांचा सागरबा, हा हा स० त्याचें नांव लंबोदररे रामा, त्याचें नांव लंबोदर ॥ १॥ ( प० ) ये कोणका झरारा ?उ० हे गणपती महाराज. प्र०—कोण खंडपती ! और सुनाव.उ०— सारजा ब्राह्म्याची काय कुमरी बा, हा हा० इंद्र सभेसि गायन करीबा, हा हा स० आली हंसावर बैसुनिबा,हा हा० वीणा पुस्तक शोभे करींरे रामा, वीणा पुस्तक शोभे करीं ॥ २॥प्र० ये कोण झरारा ! उ०—महाराज ही सरस्वती( प्र०—फारडारू) उ०—ब्रहावा ! प्र०—रे अछी लावणी सुनाव. उ०—बरें आहे.

## ॥ ठुंबरी. ॥

**मुजे गंगा नहाने जाना ॥ गंगा नहाने चली राधा प्यारी ॥साससें कर आई बहाना ॥ मुजे गंगा०॥१॥ दौना मर्वा चंपा चमेली कृष्णनाथ-कूं भोग चढाना ॥ मुजे० ॥**

बतावणी—वाहवा ! ये लेरे त्वारे बिटवाकू सेला. प्र०—महा-राज कांहीं देणगी द्यावी. उ०—जारे वो हमारी देवरी है उस देवरीमें एक खोली है, उस खोलीमें, एक पेटी है,उस पेटीमें चांदीकी डबी है उस डबींमें एक कवडी रखी है वो तुम ले जाव. वाहवा ! वाहवा ! !

सीलावंती. भस्मावंती. अय्या.



# सोंग १४ वें.

## जंगमाचें.

हर हर हर: भस्मेश्वरा. प्र०—अहो आपण कोण आहां? उ०—नावा जंगम नैदेव: प्र०—आपण जंगम आहां काय? उ०—याकी. प्र०—आपण कोठून आलेत? उ०—होबळी दिनबंदे. प्र०—आपलें नांव काय? उ०—लिंब हे सरयाना. प्र०—आपण काय कारणास्तव येथें आलेत? उ०—नावा यातक व दिंद्री याड हेना ते पेदम. प्र०—अहो आपल्या दोघी स्त्रिया चुकल्या आहेत काय? उ०—याकी. प्र०—किती वर्षें झालीं? उ०—हन्याडु. प्र०—अहो हन्याडु ह्मणजे काय समजावें? उ०—वन्न याड मुर नार आयदु ओल्ल येद उबंत हात हन्याडु. प्र०—अशीं बारावर्षें झालीं काय? उ०—याकी. प्र०—तुह्मीं कोठें कोठें शोध केला? उ०—कोल्हापूर शोध मांडते, सोलापूर शोध मांडते, नरसिंगपूर शोध मांडते, बदलापूर शोध मांडते, येली सोदाह तदुह्मा. प्र०—इतक्या ठिकाणीं शोध करून येथें आलेत काय? उ०—याकी. प्र०—अहो त्या स्त्रियांचीं नांवें काय? उ०—वन्न सीलवंती, याड भस्मावंती. हन्याडु वर्षें शोध मांडते. प्र०—अहो एक सीलवंती आणि दुसरी भस्मावंती, अशा तुमच्या दोनी स्त्रिया

चुकल्या त्यांस बारा वर्षें झालीं. तुह्मांस शोध लागत नाहीं, परंतु आतां ह्याच गांवामध्यें शोध लागला तर ? उ०—येली गांवडरी तपास मारकोटरा भाळ उपकार ऐडु. प्र०—अहो तुमच्या दोघी स्त्रियांचा शोध लावून दिला तर ह्मणतां फार उपकार होतील. उ०—याकी, भाळ उपकार. प्र०—येथें अमळ बसा. उ०—गावंडरी सीलवंती मन तिस्को शोध मांडते. प्र०—अहो, खालीं बसा. सीलवंती तुह्माला मनापासून आवडते, तिचा शोध करितों. उ०—याड भस्मावंती कर्मलिगु. प्र०—भस्मावंतीचा शोध नाहीं लागला तरी बरें, पण सीलवंतीचा शोध अधीं करू. उ०—याकी. प्र०—खालीं बसा. [ पडद्यांतून ]

## ॥ सीलवंती ॥

### ॥ श्लोक ॥

नोडवदामी बाबलोशंकर धारवाडा दुर्गडानोडु बंदेहावैई [ बाहेर ] ॥ जंगम ॥ श्लोक ॥ हावई हासीलवंती मनतिस्कोआकीडांगटतपासमारकोटरा हुडकतहन्याडु वर्षें बंदेहावैई ॥

प्र०—अहो आया तुह्मीं कां गडबडलां. उ०—सीलवंती

मनतिस्को खुणा न हेळता. प्र०—खालीं बसा मी शोध करितों, मग तुह्मीं खुणा विचारा. उ०—याकी. प्र०—अहो बाई तुह्मीं कोण अहां ? उ०—नावा जंगमीनैदेव: प्र०—आपण जंगमिनी आहां काय ? उ०—याकी. प्र०—तुमचें नांव काय ? उ०—नमसीलवंती. प्र०—दुसरी बाई कोण ? उ०—नम्म सवती इद्दाल. प्र०—तुमची सवत काय? उ०—याकी. प्र०—तुह्मी आल्या कोठून? उ०—हुबळी धारवाड. प्र०—हुबळी धारवाडाहून. उ०—याकी. प्र०— येथें कशास्तव आलांत? उ०—नम्म गंड तपीदनु शोध बंदे. प्र०—भ्रताराचा शोध करण्यास्तव ? उ०—याकी. प्र०—भ्रतार चुकल्यास किती वर्षे झालीं ? उ०—हंन्याडु वर्षें. प्र०—बारा वर्षें झालीं ? उ०—याकी. प्र०—बाई, आमच्या गांवांत एक जंगम आलेत तेच तर तुमचे भ्रतार नव्हत ? उ०—यणाखुणा नहेळता. प्र०—तुह्मीं खुणा विचाराल ? उ०—याकी. प्र०—अहो आया सीलवंती खुणा विचारील त्या सांगाल काय ? उ०—याकी. प्र०—( सीलवंती )

## ॥ श्लोक ॥

**होवैया गोरवर्णा विभूती लेपना रुद्राक्षधारणा जंगयाममप्राणप्राणा हावै ॥** उ०—याण खुणा नहेळता आया भस्म: उ०—कोपाळ भस्म: प्र०—आय रुद्राक्षा उ०—को-

याळ रुद्राक्षा ( सीलवंती नासीलवंती ) प्र०—अहो भस्मावंती बाई? उ०—अरे मेल्या हु. प्र०—वाहवा सटवे असें काय? उ०—अहो पाटील मी समजलें कीं खुंट आहे ह्मणून उडी मारली. प्र०—वाहवा भस्मावंती बाई ही आपली दशा अशी काय? उ०—नोड्डु चीर. प्र०—वस्त्र नाहीं? उ०—नकु डो. प्र०—नथ नाहीं? उ०—नोड्डु खुळ खुळ भंगारा. प्र०—वाळे नाहींत. उ०—नोड्डु. प्र०—अहो मग त्या आयानें सीलवंतीला डागीनें कसें दिले? उ०— येड्डु गांवडरी हेमेहे सरयाणा लुच्चा. प्र०—अहो आयाला लुच्चा ह्मणतां? उ०—आया तुह्माला लुच्चा ह्मणती. प्र०—जंगम नें देव लुच्चा उ०—पाटील चारि. आर्ता. प्र०—येद्दु गांवडरी सीलवंती हुडकत्त हुडकत्त हन्याड्डु देईं येंद्दु निर कुडली. प्र०—पाणी हवें काय? उ०—याक्की. प्र०—सीलवंती बाई? उ०—जी. प्र०—आया पाणी मागतात. उ०—बरें आहे.

## पद.

आताळ गंगा पाताळ पाणी सीतळ होइरे जंगैया ॥ धृ० ॥ सोनियाचे झारीमध्यें गंगाजळ पाणी ॥ आवडीनें पितां पितां सीतळ होईरे जंगैया

॥ १ ॥ बारा वर्षं पूर्ण झालीं तुमच्या आमच्या भेटीला रे ॥ आज संधीशी गांठ पडली तूं शीतल होईरे जंगैया ॥ आताळ गंगा० ॥ २ ॥

## ॥ नकल ॥

आचूळ गंगा मचूळ पाणी सीतल होईरे जंगैया ॥ धृ० ॥ खापराचे चिटकीमध्यें डबकाचें पाणी॥ चिखल पिउनी सीतळ होईरे जंगैया ॥ १ ॥ बारावर्षं झालीं भेटीला नाहीं संधेसा आलारे ॥ आज संधीसी गांठ पडली तूं चिखळ पिईरे जंगैया ॥ आचूळ गंगा० ॥ २ ॥

॥ बतावणी ॥ थुं थुं थूं !!! प्र०—काय झालें आया ? उ०—भस्मावंती निरपदु हैसी खटला ! प्र०—भस्मावंतीनें पाणी पाजलं तें हैसीच्या मूत्राप्रमाणें कां ? उ०—याक्री. प्र०—आहो भस्मावंतीबाई. उ०—कारे मेल्या डू ? प्र०—बोडके, लांब उभी राहून बोल. ते आया ह्मणतात भस्मावंतीनें पाणी पाजिलें तें हैसीच्या मूत्राप्रमाणें होतें. [ भस्मावंती ] प्र०—आया नीर हैसी खटला. उ०—पाटिल चारि आरता ॥

यदुगावंडरी इस्त्रा आसंगकोटरा. प्र०—तुह्माला उटणें लावून स्नान करायाचें आहे कां? उ०—याकी. प्र०—अहो सीलवंती बाई? उ०—जी. प्र०—आयाच्या आंगास उटणें लावून स्नान घाला. उ०—बरें आहे.

## ॥ पद ॥

चुवा चंदन अत्तर अर्गजा परदेशी जंगैया ॥आपले हस्तें मी उटणें लावितें पाणि ठेवितें तापायारे ॥ बारावर्षीं आज न्हाहू घालितें परदेशीजंगैया ॥ १ ॥

॥ नकल येरंडेल, करंजेल आणि कनक तेल परदेशी जंगैया ॥ ध्रु० ॥ बारा वर्षें पूर्ण झालीं नाहीं पाणी स्नानालारे ॥ मी प्रीतिची बाइल मोठी परदेशी जंगैया ॥ १ ॥

प्र०—अहो सीलवंती बाई, तुह्मी आणि भस्मावंती मिळून कांहीं गायन करा. उ०—बरें आहे.

## ॥ पद ॥

माता डोलिंगा वैया माता डोलिंगा ॥ ध्रु० ॥ कडुनाक डुल तु मोठी लडीवाल ॥ दासाविठ्ठल सवाय वेणु रावैया ॥ माता डो० ॥

॥ नक्कल ॥ दूर्या पदर नारी कोयाळ नका ॥ आपापा गपा मारे धपा हेली रे सुर्या दुर्या माता डोलिंगा ॥ १ ॥

## ॥ पद ॥

तो एक जंगमहो ॥ जंगमहो ॥मूळ तीर्थांचा संगम ॥ ध्रु० ॥ त्रिकूटावरी मठ केला॥ त्याचा द्वैतभाव निमाला ॥ तो एक०॥१॥ निर्विकार भूतमात्रा ॥ त्याला अक्षई माळा गात्रा ॥ तो एक० ॥ २॥ हेचि अंतरखुण दावी॥ शांति भस्म कपाळीं लावी ॥ तो एक० ॥ ३ ॥ अक्षइ भिक्षा मागे ॥ अखंड सद्गुरु भजनीं लागे ॥ तो एक० ॥ ४ ॥ शिवदिन त्याला आधी ॥ अया ह्मणुनी शरण साधीं ॥ तो एक० ॥ ५ ॥

# सोंग १५ वें

## मच्छिंद्रनाथाचें

[ सिंहलद्वीप पद्मिणीची कचेरी. ]

पद्मीन–प्र० प्रधानजी ? उ०–आज्ञा बाईसाहेब. प्र०–आपल्या राज्याचा बंदोबस्त कोणत्या प्रकारें चालत आहे ? उ०–बाईसाहेब, राज्याचा बंदोबस्त आजपर्यंत आपल्या हुकुमाप्रमाणेंच चालत आहे. प्र०–वाहवा ! प्रधानजी, शाबास ! प्रधानजी ? उ०–आज्ञा बाई साहेब. प्र०–आपल्या राज्यामध्यें दरवर्षीप्रमाणें मारुतीभुभुःकार होतो कीं नाहीं ? उ०–बाईसाहेब, आपल्या राज्यांत मारुतीभुभुःकार होऊन सालाबादप्रमाणें पुरुष मरण पावतात. प्र०–वाहवा! प्रधानजी, शाबास !

### ॥ मच्छिंद्रनाथ आगमन ॥

### पद

हाहा रमता जोगी रमता जोगी, आयारे बाबू॥रमता जोगी॥ध्रु०॥कानोंमें कुंडल बभूत लगावे॥गले बिच निर्गुण सैलीरे बाबू॥ रमता जो० ॥१॥गौड-

बंगाला मंत्र तुमारो ॥ नाथ भये गिरधारीरे बाबू ॥ रमता जो० ॥ २ ॥ कहत कबीरा सुन भइ साधु ॥ अनुहात किंगरी बजावेरे बाबू ॥ रमता० ॥ ३ ॥ रमता जोगी रमता जोगी ॥ आयारे बाबू ॥

प्र०—प्रधानजी ? उ०—आज्ञा बाईसाहेब. प्र०—आपण ह्मणतां कीं, सिंहलद्वीपाचे सीमेआंत जे पुरुष असतील ते प्रत्येक साल्हीं मारुतीच्या भुभुःकारानें मरण पावतात; मग हा गोसावी कसा वांचला बरें ? उ०—बाईसाहेब, तो कोणीतरी महासिद्ध आहे. प्र०—प्रधानजी, पहा तो स्वरूपानें तरी किती सुंदर आहे ? त्याला पाहून मी तर आपले मनाचे ठाई कामानें व्यापून, अगदीं तल्लीन झालें आहें. उ०—बाईसाहेब, तो खराच स्वरूपानें अतिसुंदर आहे. प्र०—प्रधानजी, माझी इच्छा अशी आहे कीं, ह्या गोसाव्यास सर्व राज्याधिकार देऊन याजबरोबर स्नेह करावा. उ०—बाईसाहेब, आपली इच्छा अशी आहे तर मी त्या गोसाव्यास बोलावितें. प्र०—प्रधानजी जल्द बोलवा आणि बसावयास आसन द्या. प्र०—बुवाजी आपकूं पद्मीन बुलाती ? उ०—अच्छा है. प्र०—आवो बुवाजी ये आसनपर बैठो. बुवाजी आपकी दासी मैं पद्मीन पाव पडती हूं. उ०—कल्याण होयगा. प्र०—सुनो बावाजी

## ॥ दोहा ॥

कांहासे तुम आये हो जोगी, क्या पूछते हो संदेस ॥ कौण कुलमों पैदा हुये, किने किया उपदेश ॥ १ ॥ उ० ॥ दोहा ॥ पश्चिमदिशासे आये हैं जोगी, गोरखको पूछ संदेस ॥ मगरीके पेट पैदा हुये, शिवने किया उपदेश ॥ २ ॥ प्र० ॥ सांई आपका नाम कहो.

उ०—हमारा नाम मछिंद्रनाथ. सुन पद्मीन, तूं कोण? तेरा संदेसा क्या है, सो कहदेना. उ०—सुनो मछिंद्रनाथ, मैं इस गामकी बाछाई राणी हूं. ये गौडबंगालमें मेरा हुकूम चलता है. सुनो सांईनाथ, आपकी खुबसूरत देखके मैं तन्मय हो रहीं, आप मेरी मनकामना पूर्ण करना और ये सिंगलद्वीपका राजा होना. उ०—वाहवा! पद्मीन, तेरा वचन सुनके बडा आनंद हुवा है. लेकीन मुजकूं एक बातकी बडी डर है. प्र०—सांईनाथ, आपकूं कोणसे बातकी डर है? उ०—सुन पद्मीन, मेरा शिष्य गोरखनाथ इदर आवेगा तो हमकूं ले जायगा. प्र०—सांईनाथ तुम गोरखनाथकी कुछ डर रखना नहीं. मैं बारा बारा गांव चौकी रखतीहूं, गोरख-

नाथ नहीं आवे ऐसी बंदोबस्ती करतीहूं, तुम बेफिकर राज्य करना. सांईनाथ, अब ये सैली, सिंगी, किंगरी और सब जोगीका बाना उतारो और जरतारी कपडे पेनो, सिरकूं मंदिल बांधो और सिंगलद्वीपका राज्य करो. उ०—अछा है.

[ पद्मीन ] राज्य करो मछिंदरनाथजी ॥धु०॥सिंगलद्वीपकी पदमीन ठकनी ॥ तीनलोक उने मोह लियाजी ॥ राज्यक० ॥ सबही गहीना पद्मीन पैनी पकर झुले गये हातजी ॥ राज्यकरोम० ॥ [ गोरख कानीफ संवाद. ]

## ॥ श्लोक ॥

### ॥ गोरख ॥

फिरे खंड चौखंड दर्याव घेरा ॥ भूमी देश पन्नासमों फेर सारा ॥ जबरदस्त जोगी फिरे पंथ सारा ॥ फिरे जोर जोगी भये वर्ष बारा ॥ १ ॥

हे मेरे गुरू मछिंद्रनाथ, तुमकूं धूंडते बारा बरस होगये, तोबी तुमारा पत्ता लगता नहीं. अब इस आंबके झाडतले मैं आपकी बंदगी कर्ते बैठ रहता.

## ॥ श्लोक ॥

### ॥ कानीफ ॥

फिरे सातसो शिष्य कानीफ जोगी ॥ ज्या देश

भूतट आया वियोगी ॥ तहां नाथ गोरख जोगी सयोगी॥मिल्यो ज्योग आदेश आदेश जोगी ॥२॥

प्र०—आदेश उ०—आदेश. प्र०—कानीफ आप क्या देख उठे, क्या देख बैठे, क्या देख लगाई तारी, कोण तुमारो कर्ता, कोण तुम्हारो सूत्रधारी ? उ०—मन देख उठे, मन देख बैठे, मन देख लगाई तारी ॥ मन हमारो कर्ता, हर्ता, मन हमारो सूत्रधारी. प्र०—तन छूटे मन कांहां समाना, काल कांहां समाना, ब्रह्म कांहां समाना और निरंजन कांहां समाना, जुबाब बोल. उ०—तन छूटे मन जोतमों समाना, शब्द ओंकारमों समाना, प्राण निरंजनमों समाना, हंस अविनाशमों समाना, जीव शीवमों समाना और काल शून्यमों समाना. प्र०—येतो सच्चहै, लेकिन अब तूं जोगी सच्चा होयेगा तो इस झाडके आंब आपो आपसे उतारदे.प्र०—सुनो कानिफनाथ, मैंतो झाडके आंब उतार लेऊंगा, लेकिन तुम जोगी सच्च होयेगे तो वोही आंब ओही डाहालीकूं लगा देना. उ०—तुम उतारो हम लगायंगे. प्र०—ये उतारे. ॥ ये लगाये. ॥

## ॥ साकी ॥

सिंगलद्वीपसो बंगाला,राजा काहुर देशजु ॥ पद्मी-

नसो प्रीत लगाई, छांडी जोगकी आसजु ॥ घरबारी होरहे जोगीया, न धरे किनकी आसजु ॥ तेरा जो सांई, पद्मीन माई, प्रीत लगाई, पूतजनाई, सिंग लद्वीपमों ज्या भाई ज्या तुजे राहा बताईजुजु ॥

[ गोरख ] प्र०—हम हमारे मछिंद्रनाथकूं अभी लेकर आते हैं; तुम तुमारे जालिंद्रनाथकूं लेकर आना. उ०—अच्छा है.

[ सिंगलद्वीपमें गोरख आगमन ]

॥ साकी ॥

नाथमछिंदर जोगीया, चलो गोरख आया जुजु ॥
गोरख उभथतां पुकारे, सांई तुम केव बिघरे जुजु॥
घुसा गया नैयन उघारे, गुरु अलख पुकारे जुजु ॥
पुता उठ गुरु प्यारे, बहुतदीन जीयेरे जु ॥

प्र०—बाबाजी, अब राज्य छोडके सिद्धाश्रमकूं चलना. उ०—गोरख हमतो सिद्धाश्रमकूं चलते हैं, लेकीन पद्मीनकी परवानगी चहिये. प्र०—वो पद्मीन कहां है ? उ०—ये महेलमें. गो०—माई, अब मछिंद्रनाथकूं लेजानेकी परवानगी देना. प्र०—गोरखनाथ साईंकूं ले जाव उ०—अच्छा.

## ॥ पद ॥

अलख जागे गोरख जागे॥दुवा लेना आवर होना जुजु ॥ अलख जागे गोरख जागे ॥ दुवा लेना०॥

## सोंग १६ वें.

### ॥ वैराग्याचें ॥

अलख पलखमों रामभरा सबघटमों रामबिना ये जगतमों ठाम कोई नहीं, रामबिना कोई ठाम नहीं. जलथलमों रहा समाई, ज्याहां देखों वाहां रामही राम ओही रामचंद्र महाराज सच्चेहैं ॥१॥ [ सटकसीताराम ] प्र०–तुम कोण है ? उ०–निर्गुण निराकार नीरंगी साहेब घटघटमों भरा पंच रंगी, पांचके पचीस पचीसके छत्तीस छत्तीसका एक, सो एक रामचंद्र महाराज हैं, उनके दास हम तो बैरागी हैं. प्र०–बाबाजी ? उ०–बोल बच्चा. प्र०–आप वैरागी कैसेहो ? उ०–जैसी अग्नीकूं छाया, वैसी भगवत्की माया; जिस मायेसें ये आलम सजाया, जिवमात्र जिवमात्र, आलम सजाया. जो

पाटील. बैरागीण.        बैरागी.



घट देखो उसकूं है छाया, तब ओतो घरबारी ठेरे, ऐसे हम बैरागी घरबारी हैं. प्र०—अच्छा अब इस बस्तिमें कायकूं आये ? उ०—फेरी कर्णेकूं प्र०—हमारे गांवकी बैरागन है सो तुमकूं मंगने नहीं देईगी. उ०—आरे हमतो आयोध्या, प्रयाग, काशी, गोकुल, मथुरा, वृंदावन, द्वारका, ऐसे सब तीर्थ करके गिरी गुहा धूंडते धूंडते, ऋषिके आश्रम देखते इदर आये; अब तुमारे गांवके बैरागनकूं जबाब देइंगे, और इस गांवमें फेरी करेंगे. सुन पटेल—तुमारे गांवकी बैरागन बुलाव. प्र०—आजि तलसी ? उ०—जी. प्र०—अगे आपणे गांवमें एक बैरागी आया है. उ०—ओ क्या कहता है. उ०—गांवमें फेरी करूंगा. प्र०—पटेल, मैं वो बैरागीकूं सवालके जबाब पूछूंगी. चल आवतो, कुच तेरा सवाल जुबाब होईंगे वो बोल ? उ०—आवतीहूं ॥ जयजय दशरथ नंदनकी, जयजय कौसल्या नंदनकी, जयजय लछमन बालाकी ॥ प्र०—सुनो बाबाजी.

## ॥ दोहरा ॥

कौण दिशासे आये बैरागी, कौण दिशाकूं जाना है ॥ कायसे तुम पैदा हुवा बैरागी, फेर कायमों समाना है ॥ १ ॥ उ० ॥ दोहरा ॥ पश्चम

दिशासे आये बैरागी, पूरब दिशाकूं जाना है ॥ निरगुणसे पैदा हुये बैरागी, फेर निरगुणमें समाना है ॥ प्र०—॥ दोहरा ॥ किनें दिया दंडकमंडलु, किनें दिया झारी ॥ किनें दिया भग्वा वस्त्र, किनें किया भिखारी ॥ उ०—॥ ब्रह्मनें दिया दंडकमंडलु, विष्णूनें दिई झारी ॥ शिवनें दिया भग्वा वस्त्र, गुरूनें किया भिखारी ॥ प्र०—कौण कमलमों जी बास, कौण कमलमों श्वासोच्छ्वास ॥ कौण कमल शिवको प्रकास, जीव कौण और शिव कौण है ॥ उ०—हृदय कमलमों श्वासोच्छ्वास, कंठकमलमों जीवका वास ॥ ब्रह्मांडकमल शिवको प्रकास, जीव शिव तो एकई है.

प्र०—आजी बुवाजी, मेरे सवालतो होरहे. उ०—कुच जुबाब होयगे तो बोल. प्र०—बुवाजी, अब पूजा करो. उ०—अच्छा है. एक बैंगीनारायण, दुसरा पलांडुनारायण, तिसरा लक्ष्मीनारायण. बैंगीनारायणकूं छिद्र पाडके, अग्निनारायणमों डार देना, आच्छा भाजभुजके फेर छीलना और जो दुस-

रा पलांडुनारायण है, इस पलांडुनारायणकूं सिदा काटे तो शंख बनता है और आडा काटा तो चक्र होता है. इस पलांडुनारायणकूं झिणा काटकर बैंगीनारायणमों मिसल देना. अबी एक लक्ष्मीनारायण है, उसमें थोडा सबरस डालके झिणी पिसना, झिणी पिसकर बेंगीनारायणमें मिसल देना, बुवाजी क्या मजा पडती है? प्र०—वाहवा ! वाहवा! खूब मजा पडती है. उ०—बुवाजी बडी मिठी लगती. प्र०—बुवाजी अब ध्यान करो. उ०— शांताकारम्, भुजगशयनं पद्मनाभम्, सुरेशम् ॥ विश्वोद्धारम् यत्र योगेश्वरोकृष्ण-यत्र पार्थो धनुर्धरः ये ध्यान हुवा. प्र० सुन बैरागन ? उ०—अब तूं जिती क्या हारी. उ०—बुवाजी मैं तो हारी. आपके चरणकी दासी बनजाती हूं. प्र०—सुनो बुवाजी.

## ॥ पद. ॥

हरीसंग लागूं बैरागन होऊंगी॥धृ०॥दंड कमंडलु कटी मृगछाला ॥ रामभजन गळां तुळसीके माला ॥ हरी० ॥ १ ॥ काया मोरी कंथा मन मोरो जोगी ॥ शामसुंदर जन वारस भोगी ॥ हरी० ॥ २ ॥ कहत कबीरा आंतकी बारी ॥ रामबिना दुख कोण निवारी ॥ हरी० ॥ ३ ॥

## ॥ पद ॥

हमतो बैरागी बैरागी ॥ सुरत रामसो लगी॥ध्रु०॥ भावतुंबा धरूं ॥ भक्तीकंथा नवरंग पेरूं ॥ ह० ॥ १ ॥ प्रेमटोपी शिरकूं ॥ चिन्मयटिळक लगावूं शिरकूं ॥ ह० ॥ २ ॥ केशवदासबैरागी ॥ आशा मनशा माया त्यागी ॥ ह० ॥ ३ ॥

## ॥ आरती ॥

जय जय आरती रामजी तुमारी ॥ प्राणनाथ रघुनाथ मुरारी॥ध्रु०॥मेघंबरतनु शालदुशाला ॥ शामसुंदर गळां वैजयंती माळा ॥ जय जय० ॥ ॥ १ ॥ मोरमुगुट पीतांबर शोभे ॥छत्र धरे हार लछीमनबाळा ॥ जय जय० ॥ २ ॥ सुखसागर मुनी नारद गावे ॥ भरत शत्रूघन चवरि डुलावे.॥ जयजय० ॥ ३ ॥ चरणकमलमों रहे सीता ॥ मंगल गावे कौसल्यामाता ॥ जय जय० ॥ ४ ॥

सन्मुख ठाडे हनुमान वीरा॥आरती करत है दास कबीरा ॥ जयजय० ॥ ५ ॥

## सोंग १७ वें.

### ॥ काशीकापडी याचें ॥

काशीविश्वेश्वरायनमः प्रश्न—अहो दंडवत, आपण कोण आहां ? उत्तर—अह्मीं काशीकापडी. प्र०—तुह्मीं कोठून आलेत ? उ०—काशीयात्रेहून. प्र०—येथें कशास्तव आलेत? उ०—फेरी करावी या हेतूनें आलों. प्र०—हे तुमच्याबरोबर कोण आहेत ?उ ०—हा आमचा मुलगा.प्र०—याचें नांव काय ?उ०—याचें नांव नाऱ्या. प्र० तुह्मीं कांहीं पुराण कथन कराल कां ? उ०—होय, श्रवण करा.

### ॥ श्रीगणेशायनमः भविष्यपुराण प्रारंभ ॥

प्रथम आदिमाया वैष्णवी, तिजपासूनि सृष्टि रचिली, भूगोल ब्रह्मगोळ अवतरले, प्रथम पंढरी रचिली, त्यासी युगें अठावीस भरलीं. दहा अवतार, साहीशास्त्रें, अठरा

पाटील. काशीकापडी. नाऱ्या.



पुराणें, चारी वेद, ब्रह्मा विष्णु, महेश्वर ॥ १ ॥ ब्रह्म यापासून मनू, मनूपासून मुनी, मुनीपासून ईशानजय, ईशानजयाचा महाऋषी, महाऋषींचा अंबऋषी, अंबऋषीचा कछपऋषी, कछपाच्या तेरा राण्या. त्या ऐकाव्या महाराज ॥२॥ १ ली अदिती २ दिती ३ कद्रु ४ वैणता ५ सुतलीका ६ सोमप्रभा ७ रूपप्रभा ८ कुंडलिनी ९ ब्रह्मदंडा १० कांजानी ११ पद्मिनी १२ कनकप्रभा १३ सुंदरलिका. ह्या कछपाच्या तेरा राण्या ऐकाव्या महाराज ॥३॥ तेरा राण्यांचें संतान सांगेन ॥ अदितीचे देव, दितीचे दानव, कद्रूचे नाग, वैणतेचे अरुण, गरुड. सुतलिकीचे अष्टदश लोकपाल, सोमप्रभेचे नवग्रह, रूपप्रभेचे सूर्यवंशीं, सोमवंशीं. कुंडलीनीचे साठसहस्रगण, अठ्यांयसीसहस्र ऋषेश्वर. ब्रह्मदंडिकेचे ताड माड अठराभार वनस्पती. कांजेनीचे ध्रुव पवन, चारीवेद पद्मिनीचे छपन्नकोटी मेघावळी, कनकप्रभेचे काक, बक. सुंदरलिकेचे अर्थ, सुवर्ण, मुक्ताफळ, हिरे, नीळ, पुष्कराज, माणीक, पाषाणजाती. ऐसी सृष्टी निर्माण झाली. ऐकावें महाराज ॥ ४ ॥ आतां युगांची उत्पत्ती सांगेन. वैशाखशुद्ध ३ रविवारीं हस्तनक्षत्र, ते दिनीं कृतायुग प्रवर्तलें. भाद्रपद वद्य १३ गुरुवार पनर्वसुनक्षत्र, ते दिनीं त्रेतायुग प्रवर्तलें. कार्तिक शुद्ध ९ बुधवार अनुराधानक्षत्र, ते दिनीं द्वापारयुग

प्रवर्तलें. माघवद्य ३० अमावास्या मंगळवार रोहिणीनक्षत्र ते दिनीं कलियुग प्रवर्तलें. हें ऐकावें महाराज ॥ ७ ॥

## ॥ सहादेवीमुहूर्त. ॥

बिज मंगळवारीं नळ वनवासास गेला. तिज शुक्रवारीं शिशुपाळ वधिला. चतुर्थी रविवारीं सहस्रार्जुन वधिला. पंचमी बुधवारीं रामभार्या नेली. षष्टी शनवारीं रावण मारिला. सप्तमी सोमवारीं बळी पाताळीं घातला. ह्या तिथी वारांवर पेरलें तें न उगवे. ऋण दिलें तें हातां नये. हे सहादेवी मुहूर्त जाणावे महाराज ॥ ८ ॥

## ॥ शुभनक्षत्र सांगेन. ॥

मघा, मृग, हस्त, चित्रा, स्वाती, मूळ, अनुराधा, रेवती, उत्तरा, ह्या नक्षत्रीं नवे देव पुजावे, लग्न करावें, विद्या शिकावी, धान्याचा सांठा करावा, शेत पेरावें, नवी नवरी आणावी, नवें घर बांधावें, वोटी, फळशोभन करावें. हीं नक्षत्रें उत्तम जाणावीं महाराज ॥ ९ ॥

## ॥ कोणत्या नक्षत्रीं घरें बांधावीं. ॥

अश्विनी, रोहिणी, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, आरद्रा, मूळ, उत्तराषाढा, श्रवण, उत्तराभाद्रपदा, रेवती. या नक्षत्रीं

वाडे, हुडे, घरें बांधावीं. उत्तम असे. हें जाणावें महाराज॥११

## ॥ कोणत्या महिन्यांत घरें बांधावीं त्याचें फळ. ॥

चैत्रमासीं गुरें ढोरें मरतील, वैशाखमासीं धनलाभ असे. ज्येष्ठमासीं सितळ असे. आषाढमासीं धनलाभ सांगे. श्रावणमासीं सदा सुखी. भाद्रपदमासीं अग्नि लागे. आश्विनमासीं वोसपडेल. कार्तिकमासीं मुलें मरतील. मार्गेश्वरमासीं धनप्राप्ती. पौषमासीं घरधनी मरेल. माघमासीं कन्या पुत्र होतील. फाल्गुनमासीं लक्ष्मीप्राप्ती. हें मासिकफळ जाणावें महाराज. ॥ १२ ॥

## ॥ स्त्रीस ऋतु प्राप्त झाल्याचें फळ. ॥

रविवारीं विधवा होईल. सोमवारीं मरतवांझ. मंगळवारीं घातकी. बुधवारीं कन्या होतील. गुरुवारीं सौभाग्यवती. शुक्रवारीं नातु पणतु होतील. शनवारीं चंचळ होतील. हें सात वारांचें फळ जाणावें महाराज. ॥ १३ ॥

## ॥ आतां तिथीफळ सांगेन. ॥

प्रतिपदेस विधवा होईल. द्वितीयेस सौभाग्यवती. तृतीयेस दुःखप्राप्ती. चतुर्थीस पतिभोगी. पंचमीस दरिद्रि होईल. षष्टीस सुख भोगील. सप्तमीस लाभ असे. अष्टमीस

धननाश. नवमीस पुत्रसुख, दशमीस सुख, संपदा प्राप्त. एकादशीस घरनाश होईल. द्वादशीस पुत्रप्राप्ती. त्रयोदशीस कन्या पुत्र होतील. चतुर्दशीस भोगलंपट होय. पौर्णिमा अमावास्येस सुखप्राप्ती होय. हें तिथीफळ जाणावें महाराज. ॥ १४ ॥

## प्रश्नोत्तरें.

प्र०—आतां येरे धाकट्या मुला ? उ०—कशानें थोरपण आलें तुला. प्र०—उलीसा दिसतोस पोर ? उ०—ब्रह्मीं नाहीं लहान थोर. प्र०—तुला ब्रह्म ठावा काय ? उ०—सर्वांघटीं तोचि पाहें. प्र०—ब्रह्मीं नाहीं भेदाभेद ? उ०—ऐसें बोलती चारी वेद. प्र०—तुझा भेद कशानें गेला ? उ०—सद्गुरूनें बोध केला. प्र०—बोध ह्मणजे कायरे गड्या ? उ०—आत्मस्वरूपीं पाहीरे वेड्या. प्र०—उलीसें पोर बाट मोठें ? उ०—थोर असून चाट खोटें. प्र०—माझें कां चाट झालें ? उ०—ज्ञानामुळें गर्वास आलें. प्र०—गर्व जाईल कैशापरी ? उ०—सद्गुरूचें दास्यत्व करीं. प्र०—सद्गुरूकृपा तुलाच झाली ? उ०—भूतमात्रीं भरून ठेली. प्र०—ऐसें काय यमानें केलें ? उ०—अविश्वासी बुडून मेले. प्र०—विश्वास काय सार केला ? उ०—हा अर्थ पुराणीं केला. प्र०—ऐसे कोण कोण तरले पोरा ? उ०—मिती नाहींरे

मल्हारा, प्र०—महाखळ तें कोळ्याचें पोर ? उ०—अजामेळा चोखा महार. प्र०—जात्रास जाब फार देतो उ०—बोलूं नये तें बोलतोस. प्र०—ज्ञातारपणीं भक्ती करूं ? उ०—आयुष्य काय आज्ञाधारू, प्र०—उगाची राहे देईन काठ्या ? उ०—अहंकाराच्या हाती खोठ्या. प्र०—तुझा माझा वाद झाला फार ? उ०—पांच पोरांनीं घेतलें घर. प्र०—पांच पोरें कोणाचींरे ? उ०—आत्माराम गड्याचींरे. प्र०—हा खेळ त्याचाच कायरे ? उ०—खेळ खेळुनी निराळीं कींरे. प्र०—हा खेळ तुला कैसा कळला ? उ०—ज्ञानदेव ह्मणे निवृत्तिप्रसादें फळासी आला.

समाप्त.

## भाग ३ रा.

# सोंग १८ वें.

## वाघ्यामुरळी.

ह्या ह्या जेजुरीनगरांत, कोन्या चंदनीमहालांत ॥ धृ० ॥ ह्माळसा बानाई भांडती ॥ ऐकुन मल्हारी हांसती ॥ येकुन

वाघ्यामुरळी



घेरीला बोलती ॥ बस माझ्या धाकल्या सवती ॥ ह्या ह्या जेजु० ॥ येळकोटभे ॥

बतावणी ॥ अहो राम राम पाटील. उ०—राम राम. प्र०—आपण कोण आहां ? उ०—माझे कुळींचा कुळदेव महिपती खंडेराव, वाघ्या झालों धरून भाव, नकळे माव देवाची ॥ ते आह्मीं वाघे आहों. प्र०—येथें जागरण कराल काय ? उ०—देणगी दिल्यास जागरण करूं. प्र०—काय देणगी घ्याल ? उ०—शंभर रुपये घेऊं. प्र०—अहो आमचे गांवचा वाघ्या आहे, तो पन्नास रुपये घेतो. अहो तो वाघ्या त्याच प्रकारचा असेल? प्र०—फार सुंदर आहे. उ०—बरें त्यास बोलवा. जर आह्मीं जिंकलों तर शंभर रुपये घेऊं; जर हरलों तर आह्मीं आपले कपडे तुमचे वाघ्याला देऊं. प्र०—बरें बोलवूं तर ? उ०—बोलावा? प्र०—[ अरे खंड्या ] उ०—काय हो पाटील ? प्र०—आपले गांवामध्यें वाघेमुरळी आलीं आहेत, लौकर ये. उ०—हा आलों ॥पद॥ येळकोट मालूचा बोलती ॥ १ ॥ पाटील राम राम. उ०—राम राम. प्र०—कां बोलाविलें ? उ०—आमचे घरीं जागरण आहे, तर तुझा आणि ह्या वाघ्याचा झगडा होऊंदे. प्र०—देणगी काय द्याल. उ०—जिंकलास तर शंभर रुपये व त्याचे कपडे हिरऊन देऊं. प्र०—हरलों तर? उ०—गांवांतून हांकून देऊं. प्र०—ते वाघे कोठें आहेत? उ०—हे सभेंत

प्र०—अहो राम राम. उ०—राम राम. प्र०—तुह्मी कोण ? उ०—आह्मीं जेजुरीचे वाघे. प्र०—तुमची मुरळी आहे काय ? उ०—आहे. प्र० बोलावा [ अगे राजस ] प्र०—काय ह्मणतोस उ०—आज येथें जागरण आहे, लवकर ये. प्र०—मला काय? चाल ? उ०—खोबऱ्याचा तुकडा आणि गुळाचा खडा देईन.

## ॥ पद ॥

कसा घाबरला वाघ्या घाबरला ॥ धृ० ॥ हातांत भाला भंडार त्याला ॥ घाबरला वाघ्या घाबरला ॥ प्र०—वाहवा ! हीच मुरळी! उ०—पहा कसी आहे आतां जागरण होऊंद्या. उ० बरें आहे.

## ॥ पद ॥

धांव पाव मल्हारी ह्माळसापती ॥ कर जोडुनियां विनवीते करून विनंती ॥ धृ० ॥ तूं निराकार निर्गुण सगूण जाहलासी ॥ अवतार धरून कौतुक जगा दाखविसी ॥ मनिं धरूनया दृढभाव भजावें तुजसी ॥ जाणुनी कळवळा मग तूं धाऊन

येसी ॥ निजभक्ताला रक्षितो देव हयबती॥ येळ-
कोट बोलतां भक्त आरोळ्या देती ॥ १ ॥ गड
काया हे जेजुरी केली रचना ॥ नवलक्ष पायऱ्या
रोमावली हे जाणा ॥ प्रगट नव दरवाजे दिसती
जना ॥ पालथा दहावा गुप्त कळेना कोणा ॥
भंडार घर सत्रावी पाहें प्रचिती ॥ अक्षय भरलें
भरपूर संत जाणती ॥ २ ॥ घोळ अनुहात वाजतो
अष्टमहर ॥ तो रात्रंदिवस कदां होइना स्थीर ॥
कोटंबा विवेकाचा सदा भरपूर ॥ वारी वारी
च्या बोलती दास किंकर ॥ भक्तीची गळा भंडा-
री होईना रिती ॥ तुझें नाम घेता विघ्नें दूर पळती
॥ ३ ॥ अदिशक्ति म्हाळसा नार अर्धांगी ॥ बानाइ
सुंदर शोभे दक्षिणभागीं ॥ मध्यें चतुर देव मल्हारी
रंगाला रंगीं ॥ एकच असून परी द्वैत भासल्या
दोघी ॥ खंडा सोहम्शब्दाचा झळकला हातीं ॥
मनवारूवरती आत्मा स्वार महिपती ॥ धांव ॥ ४ ॥

# पद.

बानु ह्मावसा दोघी भांडती पाहाती सकळ शाई ॥ यांत काई बरी गत नाहीं ॥ धृ० ॥ बानु ह्मणे ह्माळसे कांहीं तरी जातीवर जाणें ॥ तुला काय होत सांगून॥कलपतरूच्या झाडाखालीं चिंध्यांस गांठी देणें ॥ तुला काय सांगूं शहाणपण ॥ चाल ॥ कशि येऊन पडली गळा ॥ लाविला लळा भुलविला राजा जीजीजी॥सवतीनें पाडिली तूट केला लंपट मलया माझा जीजी ॥ गति तुझी ठाऊक अवघी कथा ऐक बानाई ॥ धनगर तुझा पिता ऐक बनाई ॥ बिरदेव तुझा चुलता ऐक बानाई ॥ सदा अरण्यांत फिरता ऐक बानाई ॥ गेला जन्म मेंढ्या वळितां ऐक बानाई ॥ कठिण शब्द बोलतां काळजामधीं रुतली सुई ॥ यांत कांहीं बरी गत नाहीं ॥ १ ॥ बानु० ॥

( बतावणी ) प्र०—अहो पाटील याणें काय गायलें ? उ०—याणें जागरण केलें. प्र०—आह्मीं करितों. उ०—ठीक आहे. [ नक्कल ] अगे राजस ? उ०—काय ह्मणतोस ? प्र०—सूर धर. उ०—काव ! काव! अरे हें काय ? उ०—आह्मीं पितरें घालितों. प्र०—वाहवा ! अरे वाघ्या तुझ्या आंगांत देव आण. उ०—बरें आहे. हुंः हुंः हुंः प्र०—अरे तुझ्या आंगांत काय आलें ? उ०—देव आला. प्र०—देवा पाऊस पडेल काय ? उ०—जन काय ह्मणतात ? प्र०—पडेल. उ०—तर पडेल. प्र०—वाहवा ! अहो देवा आमची मुरळी गरोदर आहे, इला मुलगा होईल किंवा मुलगी होईल ? उ०—मुलगा होईल नाहींतर मुलगी होईल वाहवा ! हारलास किं जिंकलास ? उ०—हारलों. घे तर आतां भंडारा आणि वारी मागत जा.

## ॥ पद ॥

सवरण वारी देवारी दे मल्हारी ॥ तुझ्या वारीचा वारीचा भीकारी ॥ ध्रु० ॥ वारी सुवर्ण सुवर्ण सोन्याची ॥ वारी माणिक माणिक मोत्यांची ॥ आह्मां दिलेंहो दिलहों तांबेदान ॥ देव देईल देईल सहस्रगुण ॥ सवरण वारी० ॥ १ ॥

सोंग १९ वें.

# कैकाडनी ( शांखिनी )चें

[ चार कैकाडनी सजून चार बाजूनें ह्मणत याव्या. ]

## हा अभंग ह्मणतात.

अरे अरे विठ्या, मूळमायेच्या कारट्या, तुझी रांड रंडकी झाली, जन्मसावित्री चुडा ल्याली. विठ्या तुझें गेलें मढें, तुला देखून काळ रडे, उभी राहुन वृंदावनीं, शिव्या देती दासी जनी-ये तांबड्या चोळीचे बये, ये गोऱ्या तोंडाचे बये, ये तांबड्या मुंडाशाचे बाबा, ये मोठ्या नथीचे बये, ये चौकड्या-वाल्या बाबा, ये काळ्या दांताचे बये, ये मोठ्या पोटाच्या बाबा, ये चिपड्या डोळ्यांचे बये, येऊंदेग; सईकाकू तुझ्या मुलाबाळांची ओवाळणी, घे धुळ धुळा बगुंडाळा खुळखुळी.

"बतावणी" पाटील— तुह्मीं कोण ? कै०— कैकाडनी.
पा०—तुह्मीं कोठें असतां ? कै०—आह्मीं बावन मातृका व

## फैकाडणी.



बाहात्तरकोटी कात्यायनींच्या मेळ्यांत असतों. पा०—येथें कशाकरितां आल्यात ? कै०—शकुन सांगायास आणि दान मागायास. पा०—ठीक आहे.

## ॥ पद ॥

कैकायी कैकायी बाबा दुरील माझा देश ॥अलक्षपूर नगर तेथें आह्मां रहिवास ॥ सहज आह्मी बीज केलें शकुन सांगायास ॥सांगिजेल तेथें दादा धरी पाय विश्वास ॥ ध्रु० ॥ प्रथमचि मी तव दादा कैकाडीन झालें ॥ तेथिंचें तेथींचें तेथें अवघें संचलें ॥ होतां घडमोडी नाहीं स्वरूप कालवलें ॥ कैकायी० ॥ १ ॥ काळाई गोरी आई नव्हे सांवळाई॥मच्छाई कूमाई नव्हे वऱ्हाई नरसाई ॥ वामनाई परशाई नव्हे रामाई कृष्णाई ॥ बोधाई कल्काई नव्हे शकुन सांगों काई ॥ कैकाई० ॥ २ ॥ दिसे तें तें भूरदादा सांगों काये

अंतीं॥चंद्रसूर्यक्षणामाजी भूर होउन जाती ॥ चौदा मन्वंरे दादा तीहीं भूर होती॥पहातां अवघे दादा भूर अनुभव प्रचीती ॥ कै० ॥ ३ ॥ कैकायी कैकायी ऐसें बोलती घरोघरीं॥कैकायी कैकायी ऐसे कोणीन विचारी ॥ धनधान्य पुत्र पौत्री हाची सोस भारी ॥विषयलोभासाठीं दादा ठकल्या नर नारी॥ कै०॥४॥सहज परीस दादा सांगेन हितगुज गोष्टी ॥ सांडुनिया मायाजाळ राहें निज दृष्टी ॥ सद्गुरु कृपें केशव राजी कैकायीसी भेटी ॥एकांतीं लोकांतीं पडली निजवस्तूशीं मिठी ॥ ५ ॥

## सोंग २० वें.

### गोंधळयाचें.

गोंधळी०—बाबा रामराम. पाटील.—रामराम. कोणरे तूं ? गों०—मला नाहीं कां ओळखलें ? मी तुमच्या वडिलांचा गोंधळी आहें. तुमच्या घरीं गोंधळ आहे, तर मला सुपारी

द्या. पा०—अरे तूं पाठवणी काय घेशील ? गों०—तुमचें वडील वीस रुपये देत होते तुह्मीं दहा द्या. पा०—बरें मग ये. [ दुसरा गोंधळी. ] गों०—बाबा रामराम. पा०—रामराम. तूं कोण ? गों०—मी गोंधळी तुमच्या वडिलापासून आहें; तुमच्या घरीं गोंधळ आहे ह्मणून सुपारी मागावयास आलों. पा०—पाठवणी काय घेशील ? गों०—तुमचे वडील दहा देत होते तुह्मीं पांच द्या. पा०—बरें, मग ये. ( पहिला गोंधळी ) गों०—पाटील बाबा द्या सुपारी. पा०—अरे दुसरा गोंधळी आला होता. गों०—मग काय बोलणें झालें बाबा. पा०—तो ह्मणाला पांच रुपये द्या. गों०—हं! हं!! मला आडीच द्या. पा०—बरें मग ये. [ दोघे गोंधळी ] गों०—कायरे संट्या, विठ्या त्वां यजमानाच्या इथं जाऊन नास करून टाकलास. दु०गों०—वाहवा!! विठ्या त्वां नास केला कीं म्यां केला ? ठीक ! ! गों०—बरें चल आतां दोघे मिळून सुपारी घेऊं. गों०—मी बराबर हिस्सा घेईन हो, मग ह्मणशील हें ना तें ! [ दोघे गोंधळी ] गों०—यजमान द्या सुपारी, आह्मीं दोघे मिळून गोंधळ घालूं. पा०—बरें आहे. गों०—आणा घटाचें सामान. पा०—हें घ्या. गों०—बाबा घट मांडला, आतां उभे राहतों. पा०—बरें राहा उभे. गों०—अरे मोरया मोरया नाम तूझें, कृपासागरा हेंचि माहेर माझें, तुझी सोंड बा वांकुडी एकदंता, मला बुद्धि दे मोरया गुणवंता.

मोरगांवच्या मोरोबा गोंधळा ये, पंढरीच्या विठोबा गोंधळा ये, जेजुरीच्या खंडोबा गोंधळा ये, निमगांवच्या खंडोबा गों० तुझा गोंधळ मांडिला गोंधळ. करस्याचें येमाई गों०, तुळजापुरचे तुकाई गों०—जाखाई जोखाई गोंध० रानी वनीच्या देवता गोंध०—तुझा गोंधळ मांडीला गोंध०, राहिले साहिले गों०

## ॥ गण ॥

गणराज गजानन गावा हो ॥धृ०॥ व्याळवेष्टितदोंद विराजे नाचत रंगणीं पाहावा हो॥१॥आदिनारायण गणपतिवरदें ॥ कीर्तनीं करी निज ठेवा हो॥२

## गोंधळ.

सुदिन सुवेळ तुझा मांडिला गोंधळहो ॥ पंचप्राण दिवट्या दोनी नेत्रांचे हिलाल हो ॥ ॥ धृ० ॥ घटस्थापना केली पंढरपुर महाद्वारींहो ॥ आकाशीं मंडप दीधला ते नेत्रीं ताला वरीहो ॥१॥ बैसली देवता पुढे वैष्णवांचे गाणें हो ॥ उदोकार गर्जती गळां तुळसीचें भूषण हो॥

असे गोंधळ कुठे कुठे पडले होते. तुळजापुरीं, कौंडनपुरीं. कथा कोणती लावूं यजमान ? काळ्या चांप्याची, कां आम्र पासोड्याची, कां जायराणीची ? पा०—जायराणीची. गों०—नमो गणपती नमो श्रोतया, नमो माझ्या हारिवा सु नारायेणाहो, माझ्या०—हाः हाः हाः कथा ऐका. आमुक फलाण्या गांवचा राजा जीजी, राजा बिस्तान्या गांवीं गेला गेला जीजी, त्या राजाचें कायबा नांव नांव जीजी, तें कोणा बेळ्याला ठावें ठावें जीजी, एक सौदागर राणी राणी जी जी, तिचें नांव जायराणी राणी जीजी, जायराणीनें सिणगार केला जी, नेसली जरतारी पाटोला जी, आंगीं मदनाचीकांचोळी जीजी. पाईं बिचव्याचा झणत्कार कारकारजी, गळां नवरत्नांचा हार हार जी, हातीं घेउन पंचारती, आरती जी, आपला पती ओंवाळिती, हाः हाः हाः हाः मोर गांवच्या मोरबा ठानका जा, जेजुरीच्या खंडोबा ठानका जा.

## [ नांवें ओळखण्याच्या खुणा ]

| | |
|---|---|
| क—करंगली | प—पसा. |
| ख—खर्ग. | फ—फरारा. |
| ग—गगन. | ब—बगल. |
| घ—घंटा. | भ—भाला. |

न—नख.
च—चक्र.
छ—छत्र.
ज—जमलीं पांच बोटें.
झ—झळकली.
य—याहो.
ट—टक्कर.
ठ—ठोसा.
ड—डमरू.
ढ—ढाल.
ण—नख.
त—तलाव.
थ—थरथर.
द—दऊत.
ध—धर्मीक बोट.

म—मनगट.
र—एक वांकडे बोट.
ल—दोन बोटें वांकडीं.
व—वळली मूठ.
श—शंख.
स—शेषफणी.
ह—हालले बोट.
आळ हाताचे.
क्ष—चुटकी.
ज्ञ—उरावर हात.
अ आंगठा.
ई—ईडा.
ब—बोटावर रेघ ओढावी.

खुणा समाप्त.

भाग दुसरा समाप्त.



( ललितसंग्रह भाग २ रा. )

# सोंग २१ वें.

## गारुड्याचें.

पोवी हिरामन बीडे बिरामन गारुड पैदा किया जी।

चौदा ताड उंचा धोबी, सात ताड है रुंदाजी, बारामण खाता धोबी, सात पखाल पाणी पीताजी, सात ताड हातमें लीये, खंब ठोकके खडा जी.—लगे लगे लगे लगे ! हांय हांय हांय हांय ! किन्ने चुट मारी, ढोल बंद किया ! धांव खंडोबा धांव ह्मसोबा ! दुसमानके मूमें मट्टी पडो. गुरूका चेला होऊंगा. तो उसे हात बताऊंगा, अब ईलम देखो चमडेका. जिता साप बनातोव. अरे रे रे काट खाता है.

## ॥ पद ॥

### गरुडनाथाचें.

आदि पुरुष निर्गुण निराधारकूं याद कर, मेरे परवर दिगरकूं याद कर, जीन्ने आजब माया बनाई उस वसतादकूं याद कर, गैबी हुन्नर पैदा किया उस फिरतारकूं याद कर, संत महंतकूं याद कर, श्रीभगवंतकूं याद कर १ जोग जुगतका बांदू तोडा, सम दम शिरपर शमला छोडा, समता सोही सुहावे तुरा, गुरु गारोडी बीर पुरा २ नैन चिरके खाये निद्रा, कान फारके पैन्हि मुद्रा, अनुहात धनु बडा वाजे, नागसुरकी धुन गरजे. ३ चल चल चल चल चल, निरंजन जंगलके जीवडे चल, खेलता है तो उलट दृष्टीसे खेल, चूप करेंगा बदफैल, तेरी मूंडी काटेगा. ४ साप सब भुले वीछू कीडे; प्रपंच पेटारेमें आण पडे,

बडे बडे जानवर पाले; हारे जरदे उजले ५ काला पीला भला बे भला, अभिमानका जोडा,झूट मूट चुपी लडा, नहीं कहू तो ब्रह्मांड कटाने दवडा, दौर मीया दौर दौर दौर. ६ हाय हाय हाय हाय, आबा बाबा बाबा, आला लाला लाला,आता ताता ताता, ७ हाय, हाय डंक मारारे मारा, भले भलेसे नहीं उतारा, जद लगाये गुरुग्यानका झौरा, जद जहेर उतारा ८ विद्या खेल हांडीबाग, हांडीबाग बडा आलबेला, हात हालावे पांव हालावे. भाले भोले लोक भुलावे. ९ आजी हांडीबाग. आहाजी, बाप बडा क्या बेटा बडा ? नैजी बेटा बडा, बेटे आगे बाप खडा ? गुरु बडा क्या चेला बडा ? चेला बडा, चेले आगे गुरु खडा ! धनी बडा क्या चाकर बडा ! चाकर बडा, नैजी धनी आगे चाकर खडा. सास बडी क्या बहु बडी ? बोहुके आगे सास खडी. बिबी बडी क्या बांदी बडी, बांदीके आगे बीबी खडी ! लेकर निराधारकी छडी, बीबी कसमके छातीपर चढी, तहीं नहीं नहीं नहीं ताहां नहीं, अल्लम छडा, लोभी आंधलेकू उडावूं, फूक मारूं तो ज्या ज्या ज्या. १० ज्यां आवना नहीं तव्हां ज्या, ज्या ज्या नहीं ताहां ज्या, अनादनके झाडऊपर ज्या, बोधके पहाडऊपर ज्या, मेरे सद्गुरु दाताकूं शरण ज्या, मेरे गुरु दाताकी इतनीसी लकरी, वो मूल मंत्रसे हातमें पकरी,

फेर देखेतो मेरी मेरेपास११अबी अबी करूंगा खबुतरका तमाशा, बीन पंखसें उडावत है कैसा, देख तो आवे देख, खलीतेमें घुसा, आवबे आव बाहेर आव, बाहेर आव, जीसे हात ना पाव, जीसे गांव ना ठाव, जीसें नहीं रूप रेखा नांव. कछुबी नहीं, धीरे धीरेसे मंत्र बोलूं, लिंगदेहकी गांठ खोलूं, मैं ऐसा एकवार खेल खेलूं की, मेरे बडे बडे बडे बडे नहीं खेले, आवल करूंगा एक, एकके करूंगा दो, दोके करूं तीन, तीनके करूं चार, चारके करूंगा पांच, पांचके करूं पचीस, पचीसके करूं छत्तीस, छत्तीसका करूं एक, एक नहींतो एका जनार्दनीं देख. १२

## ( आंब्याचें झाड करण्याची रीती )

हरभऱ्याच्या आंबी ( खाटी ) ची आंब्याच्या सुकलेल्या कोईस [ बाठ्यास ) एकवीस पुटें द्यावीं आणि पुटें दिलेला बाठा आपल्याजवळ ठेवावा. जेव्हां झाड करून चमत्कार दाखविणें असेल, तेव्हां चांगल्या मातीचें आळें करून त्यांत पूट दिलेला बाठा पुरावा आणि त्याजवर माती भिजेपर्यंत पाणी शिंपावें, म्हणजे ताबडतोब झाड होईल.

## ( जोंधळ्याच्या लाह्या करण्याचा विधि )

दीड इंच जमीन खणून जोंधळे पुरावे, वर माती घालून जमी-

न सारखी करावी. त्याजवर चुन्याची भट्टी लावावी. चुना भाजून तयार झाला, मग ती जमीन खणून जोंधळे काढून घ्यावे. जेव्हां लाह्या करून चमत्कार दाखविणें असेल, तेव्हां एक चादर किंवा धोतर चार बाजूनें ताणून धरण्यास सांगावें आणि आपण पाण्यानें भिजवून रुमाल हातांत छपवून ठेवावा, मग ते जोंधळे त्या चादरीवर टाकून हातानें हालविण्याचें निमित्त करून त्या रुमालांतील पाणी जोंधळ्यांवर पिळावें, ह्मणजे जोंधळे उफलून लाह्या होतात.

## नळ्यांतून दोरी काढण्याचा प्रकार.

दोन नळ्या घ्याव्या व एका नळींतली दोरी ओढली ह्मणजे दुसऱ्या नळींतली दोरी आंत जाते. ह्या दोऱ्या कश्या आंत जातात. कारण त्या दोऱ्यांच्या शेवटास शिशांच्या गोळ्या बांधलेल्या असतात.

## गुलाबाचें फूल पांढरें करण्याचा प्रकार.

गंधकाचा तुकडा पेटवून बशीवर ठेवावा आणि त्यावर गलास उपडें घालावें आणि फूल आंत ठेविलें ह्मणजे गुलाबाचें फूल पांढरें होतें. [ गुलाबाचें फूल पांढरें केलें, तें पुनः तांबडें करण्याचा प्रकार ) उदक मिश्रित गंधकाचे तेलामध्यें पांढरें झालेलें फूल घातलें ह्मणजे पूर्ववत् तांबडें होईल.

बहिरा.



# सोंग २२ वें

## बहिऱ्याचें.

अहो राव राम पाटील राम राम. पा०—तूं कोण आहेस ? ब०—मी आतांच आलों. पा०—तुझें नांव काय? ब०—सरकारांत जातों. पा०—तूं कोठून आलास ? ब०—माझें नांव बहिरु. पा० तुझा गांव कोण ? ब०—बैल दोन आहेत. पा०—तुझी खबर कशी काय आहे ? ब०—शेतांत रताळें पेरलेत. पा०—अरे तुला मुलें किती आहेत ? ब०—उकडून खावीं ह्मणजे गोड लागतात. पा०—वाहवा ! वाहवा ! !

# पद

बहिरा मी झालों देवा, तुझे गुण ना ऐकीले ॥ भवाचे प्रवाहीं, मी पडलों ऐसें झालें ॥ धृ० ॥ तें स्थान नाहीं होतें, तयानें तुडविलें ॥ धांव पांडुरंगा, दावीं संतांचीं पाउलें ॥ बहिरा मी० ॥ १ ॥ संतांसीं विनवितों, तुह्मीं जातां पंढरीसी॥ सांगा माझी विनवणी, येवढी पांडुरंगासीं ॥ बहिरा० ॥ २ ॥ बहिरा मज ऐसें करीं, नाइके कोणाची हो निंदा ॥ दुसरें मज कांहीं नको, लावीं रामनामीं सदा ॥ बहिरा मी० ॥ ३ ॥ याचक मी हेंचि मागें, देईं संतांची सेवा ॥ हेंचि माझी प्रार्थना, सांगा पंढरीच्या देवा ॥ एकनाथ ह्मणतसे, विठ्ठलनाथापरि ध्यावा ॥ बहिरा मी० ॥ ४ ॥

मुक्याचें.



# सोंग २३ वें.

## मुक्याचें.

खाजवून हंसावें हीः ! हीः ! हीः ! हीः ! हीः ! पाटीऌ० म०—तूं कोण आहेस ? तुझें नांव काय ? मु०—[ हातानें खुणा दाखविणें. पा०—पृथ्वीला वेढा समुद्राचा. मु०—[ मंथन करण्यासारखी खुणा करावी. ] पा०—त्या समुद्राचें मंथन केलें. मु०—चौदा रत्नें निघालीं याप्रमाणें खुणा दाखविणें ] पा०—समुद्रांतून चौदारत्नें निघालीं. मु०—[ त्यामध्यें लक्ष्मी होती याप्रमाणें खु० ] पा०—ह्या रत्नांत लक्ष्मी होती. मु०—[ लक्ष्मी

चा भ्रतार विष्णु याप्रमाणें खु० ] पा०—त्या लक्ष्मीचा भ्रतार विष्णु. मु०—तें विष्णु माझें नांव. पा०—वाहवा ! !

## ॥ पद ॥

मुका मी झालों देवा, केला प्रपंच हेवा ॥ बहु दोष आचरलों, पूर्वजन्मीचा ठेवा ॥ धृ० ॥ मुकलें पूर्वस्थान, स्वरूपाचें विंदान ॥ माझा मी आहें कवण, हें नकळेंचि ज्ञान ॥ संतांचें संगतीनें, नाहीं आत्मनिवेदन ॥ गुरुकृपा मज व्हावी, येवढ मागतों मी दान ॥ मुका मी० ॥ १ ॥ आतां मज वाचा देईं, गुण वर्णिन मी कांहीं ॥ संतकृपा करतील, तेची दाखविती सोई ॥ याचक मी हेंचि मागें, उदारा तूं दाता होईं ॥ नाहीं तरी सोड बिरुदा, जाईन आपुल्या ठाईं ॥ मुका मी० ॥ २ ॥ माई होउनी दुर माई, नको होउंची आतां ॥ अर्थ माझे पुरवावे, तुजविण कोण त्राता ॥ एकनाथ हात ठेवी, श्रीमस्तका वरुता ॥ विठ्ठलनाथा धन्य केलें, वैष्णवासरता ॥ ॥ मुका मी० ॥ ३ ॥

## सोंग मुक्याचें समाप्त.

भुते



## सोंग २४ वें.

# भुते [ आराध्य ]

आई रेणुके मूळमाया सुंदरीगे, नांदते तुळजापुरीं ॥ धृ० ॥
बाई दसरेको वारु सिनगारीलो, नगरीको तेली आलोजी ॥

आईको माईको सवा रुपया दिलोगे, आईको गंडो लेलो-जी ॥ मोरे आंगनमों वारू थडकाविलोगे, मैं नथनी हुडका विलोजी ॥ आई रेणुके० ॥ उदोग उदोग बोला, सारा बाई डोंगर गरजलाग, गरजला ॥ ध्रु० ॥ दयाळा आंबाबाई, आईनी मंदिरीं जाब दिलाग, जाब दिला ॥ दिवस मावळला, कौंडनपुरीच्या लवयनीग, लवयनी ॥ दयाळा आंबा-बाई, आनंदें ये धांउनीग, ये धांउनी ॥

प्र०—अरे मेल्या तुक्या ? उ०—आग काय ह्मणतीस? प्र०—मेरेकूं तूं पछानला? उ०—होय. प्र०—मेतो हाती हारतकूं ओळखली. उ०—होय. तूं सुरतेमध्यें होतीस. प्र०—पछी बेसी वाहणमां ने आई हुंबईमां. उ०—आग तूं झाजांत बसून मूंबईस आलीस. प्र०—मेतो बाई येच बोली. उ०—बरें मग ? प्र०—चार रुपयांनी लीधा भाडानी जागा. उ०—चार रुपयांची भाड्याची जागा घेतलीस. पुढें ? प्र०—आरे मेला तुक्या ? उ०—काय ह्मणती? प्र०—तारे शुं मारो भपको. उ०—कसा तुझा भपका होता ? प्र०—मारे माथामां तो खेकड्या. उ०—आग खेकड्या कोणी माथ्यांत घातल्यात ? प्र०—नोहिरे मुवा सुंनानी. उ०—आग त्या राखड्या. प्र०—मेतो बाई येच बोली. उ०—वाहवा पुढें ? प्र०—कानमां तो झुंबरया. उ०—वाहवा ! प्र०—आरे मोती सुनका. उ०—त्या लुगड्या असतील. पुढें ? प्र०—गळामां तो पटपटी. उ०—वाहवा ! आरे मुखां सुंनाको.

उ०—तुळसपट्टी असेल. प्र०—मेतो येच बोली. उ०—बरें पुढें ? प्र०—मारे हातमां तो बंद नाख्या. उ०—ठीक, मुसक्या बांधल्या असतील. प्र०—नाहिंरे मुवा, चांदीको. उ०—त्या वेळा असतील. प्र०—मारे कंबरमां तो हेलपटी. उ०—वाहवा ! प्र०—अरे मुवा चांदिको. उ०—तो कंबरपट्टा असेल. प्र०—मेतो बाई येच बोली. उ०—पुढें? प्र०—मारे पगमां तो शेबरको खोडो. उ०खोडो काय? प्र०नाहिंरे मुवा रुपाको. उ०—ते पायांत तोडे असतील. प्र०—तारें मारो सुं भपको. उ०—वाहवा ! तुझा काय भपका ! प्र०—अरे तुस्या ? उ०—काय ह्मणतां? उ०—आई सुं छे ? उ०—मह्या उच्छाव आहे. तूं येथें कशाला आलीस ? उ०—हूं तो जोगवा मागवा आवी. प्र०—बरें आहे. मागा जोगवा.

आई रेणुके मूळमाया सुंदरी; नांदते तुळजापुरीं जी ॥ ध्रु० ॥ आई कल्होळाची आंघोळ करी ॥ जडिताचा टोप शिरीं ॥ नाकीं मोतीं चकचक करी॥गायमुखास जाय झडकरी करींग॥ आई रेणुके० ॥ १ ॥ माझे दयाळ तुकाबाई ॥ तुझे तुळजापुरीं ठाणें ॥ धांवणें धावलीस ॥ केलें भक्तासाठीं येणेंग ॥ २ ॥ माझे दयाळ तुकाबाई ॥ किती वर्णूं तुझी थोरीग ॥ आपुल्या भक्तालागीं ॥ पावसी परोपरी ॥ ३ ॥

सोंग आराध्याचें समाप्त.

हरिदास.



# सोंग २५ वें.

## हरिदासाचें

[ हरिदास व दोघे शिष्य. ]

शिष्य. उठाउठा ! दुसराशिष्य.—बसांबसा ! प० शि०—कशा-
ला बसा ? येथें काय तमाशा आहे ? दु० शिष्य०—होहो चाल-

चा समया. पाटील०—अहो तुह्मी कोण आहां ? शि०—हरिदासाचे शिष्य. पा०—हरिदास बाबा कोठें आहेत ? शि०—हे मागें येतात. हरिदास०—कोणी शिष्य आहे कीं नाहीं? शि० जी महाराज, मी जवळ आहें. ह०—हा कोण विठू ! अरे माझी तपकिरीची डबी आण पाहूं ? शि०—तपकिरीची डबी हारवली ? ह०—आं, कशी हारवली? शि०—कोठें पडली कोण जाणें ! दु०—महाराज आहे डबी. ह०—दे पाहूं. गेले सालीं पुण्यांत एक पैची गुलाबी तपकीर घेऊन ठेविली होती, तिचा स्वाद पाहूं कसा लागतो? शि०—महाराज, गेले सालची तपकीर अजून आहे काय ? ह०—हा मूर्ख बेय्या, वोढतो कोण ? आण डबी. शि०—घ्या डबी [ टाळ ] पुढें देतो. ह०—[ तपकिरीची चिमूट घेऊन ओढावी, समोर पाहून ] हे कोण बसलेत ? शि०—महाराज हे पुढें बसले तेच का ! ह०—होय. शि०—ते देहूकर. ह०—हां हेच का ते देहूकर, ह्यांची विशाद काय ? आमच्यापुढें कीर्तन करणार ! शि०—छीः त्यांची पुण्याय काय ? ह०—हे कोण सव्यभागीं बसलेत ? शि०—हे धामनगांवकर. ह० हेच का धामनगांवकर ? ह्यांची विशाद काय ? हे आमची बरोबरी करतील ? शि०—वाहवा ! महाराज, तुमच्या आतां गप्पा राहूं द्या; कीर्तनास आरंभ करा. ह० आं बरें आहे. अरे राम्या, विठ्या, जा, जा, जा, लवकर जा.

पखवाज्यास बलावून आण. शि०—महाराज, हा पखवाज्या उभा आहे येऊन. ह०—अरे रामा, जा आपले सोन्याचे टाळ आहेत त्यांतून दोन टाळ आण. शि०—महाराज तुमची व्याहेरीच मोठी ! उपासी होतां, तेव्हां एका टाळाचे फुटाणे चावले नाहींत ? ह०—हा मूर्ख बेट्या ! अरे कंठाळीमध्यें वडलांच्या हातचा टाळ आहे तो आण. शि०—हा आणला घ्या. ह०—तंबोरीचा सूर लावून कीर्तनास आरंभ करतो.

भजमन नारायण नारायण नारायण नारायण भजमन नारायण [ ताल तोडावा ] श्लोक ॥ अष्टादशपुराणानी, कवीनां कथितं द्वयं ॥ परोपकाराय पुण्याय, पापाय परपीडितं ॥ आः हाः महाराज, ज्या काळाच्या ठाईं कलींत अन्नमयप्राण स्वयें विष्णूनें गोकुळांत अवतार धरिला. “ तो हा नंदाचीया घरीं, उंबरा चढतां टेका धरी” ॥ येथें ज्ञानोबानें मेख मारिली ॥ ओंवी ॥ पापात्मकंपुण्याय, पुण्यात्मकं पापाय ॥ सारासार पाहून बरवें, चाणाक्ष विचारिती ॥ येथें मोरोपंतानें मेख मा० ॥ आर्या ॥ पुण्यास्तव धर्मानें ढीवरास दक्षणा दिधली॥ त्याणें सुत जाळेंकरून मत्स्यांचीं क्षेत्रेंचि क्षेत्रें वधिलीं ॥ येथें ज्ञानोबानें मेख मा० ॥ ओंवी ॥ सप्तशृंगें ज्याचे शिरीं, स्वचरणें पृथ्वी विदारी ॥ त्याचा शब्द ऐकुन नारी, भ्रतार त्यजून ऊठती ॥ पहा पहा महाराज! याचा अर्थ हा धामनगांवकराच्यानें होणार आहे

काय छी. ते काय, आपल्या बोडक्याचा करताव! हें कर्म आमचें आह्मींच करावें [ हंसावें ] हाः हाः हाः शाबास शाबास ! ! आमची वाहवा ! काय मजा झाली पहा ! महाराज, येथें तुकाराम बाबानें० ॥ तो हा गवळी याचे घरीं उमरा चढतां टेंका धरी॥ पहा महाराज ह्मटलें आहें, येथें कोणी समर्थानें ह्मण केली आहे ॥ ओंवी ॥ सप्तसमुद्रीं गा जन्मला, नावेंत बैसोनियां आला ॥ सूर्य किरणीं तप्त झाला, तो वीर कोणरे अर्जुना ॥ पहा पहा महाराज, हा अर्थ किती बिकट आहे, हा अर्थ हे देहूकर करूं शकतील काय? आं. छीःत्यांची काय पुण्याय! हा अर्थ आह्मींच करावा. धन्य आमची.शाबास आह्मीं ! कारे राम्या,विठ्या.कशी गम्मत झाली!! शि०—वहवा महाराज! खुब गप्पा झोकल्या, आतां आटोपतें घ्या.ह०—बरें परंतु आणखी कोठें पुराणांत सांगितलें तें असें, सर्व मंडळी जीव देऊन ऐका ! हां: हां: येथें मोरोपंत० ॥ आर्या ॥ कृष्ण ह्मणे हो माते, मजला जल्दी करूनि दे मांडा ॥ घारी पुरी गुळगुळे, बांधुन दे जाति गाइंच्या झुंडा ॥ काय सांगावें महाराज, येथें मोरोपंतानें०— ॥ आर्या ॥ पोळी खाजी करंजी, घींवर घारगे जिलेबिती ताजी ॥ त्यावर फुरका भुरका, कढी सरसा घ्या तुह्मीं आतां भुरका॥ पहा, येथें ज्ञानोबानें०॥ओंवी॥ तीळ लावून करी भाकरी, तीक्ष्ण वांग्याचें भरित भरी; मुळे

कांद्याच्या कोशिंबिरी, वर आंब्याचें लोणचें दे ॥ येथें मोरोपंता० ॥ आर्या ॥ पुरी घारी कचोरी, बुंदी आणिक लाडु चुरम्याचे॥गाइ तुझ्या वळितों मी, तूं देतिस काय मजाशिं धर्माचें॥ आं- हो. ही तर पोटाचीच खटपट. मागें लिहिलेली कथा राहिली ती ऐका ॥ श्लोक ॥ अष्टादश पुराणानि कवीनां कथितं द्वयं ॥ वहावा ! महाराज, काय सांगितलें आहे कीं, कृष्णानें स्वयें अवतार गोकुळांत धरिला. त्या काळाच्या ठाईं महाराज येथें तुकारामबोवानें०॥तो हा नंदाचीया घरीं, उंबरा चढतां टेका धरी ॥ आहाः काय सांगावें महाराज! शि०—महाराज, रात्र फार झाली, आतां आरती करा. हं०—बरें आहे.

## आरती ह्मणावी.

---

आंधळा.



# सोंग २६ वें.

## आंधळ्याचें.

( आंधळा—विठ्या, नाऱ्या, आणि ताई. )

॥ हरीरेरामरामा, रामराया राघोबारे. ॥ १ ॥ ज्याचे आ-ई बाप मेले, त्याचें सर्व पाप गेलें ॥ २ ॥ ज्याचे आई बाप

आहे, त्याचे घरीं पाप राहे ॥ ३ ॥ ऐसा अभंग केला को-णी, त्याचे आईबाप मेले त्यांणीं ॥ ४ ॥

॥बतावणी.॥पाटील०—अरे तुह्मीं कोण आहां? आहां?आंध०—कोण विचारतो बाबा ? पा०—मी पाटील आहें. आं०—नाऱ्या पाटली टीरें. पा०—वाहवा ! अरे मी या गांवचा पाटील आहें. आं०— आतां समजलों, तुह्मीं पाटील हा. पा०—तुह्मीं कोण आहां ? आं०—आह्मी आंधळें वारकरी. पा०—तुह्मी कोठें जातां ? उ०—आह्मीं पंढरीस जातों. आह्मांला उतरायास जागा पाहिजे. पा०—ह्या धर्मशाळेंत उतरा. आं०—बरें आहे, नाऱ्या चला धर्मशाळेंत बसूं [मुशाफर येतो] मु०—आबे आंधे तुम कोण है ? आं०—आह्मीं आंधळें वारकरी आहों; तुह्मी कोण बाबा ? मु०—हाम मुशाफर सिपाई हैं. आं०—नाऱ्या हा मुशाफर आपल्या ताईला नेईल हो, संभा-ळा! नाऱ्या०—बाबा ताई कुठें गेली? ताई०—ही मी बसलें आ-हें. मु०—आबे आंधे हाम न्हानेकूं जाते हैं, मेरे कपडे और ये रुपयेका खीसा तुह्मारे पास रखो. आं०—बरें आहे, सि-पाई बाबा ठेवा. आह्मीं हरीचे भक्त आहों. मु०—लेव आंधे ये कपडे; और ये रुपयेका खीसा रखो, हाम न्हाके आये फिर लेईंगे. आं०—द्या बाबा, ठेवा येथें. आं०—नाऱ्या हा पाहिला रुपयांचा खिसा? नाऱ्या—आबा ! बा बा बा बा !

आं०नाऱ्या बरें झालें ना; तुझें आणि विठ्याचें लगीन क-रीन हो. ( इतक्यांत ) मुशाफर—आबे आंधे, वो आंधे. आं०—नाऱ्या कोण आहे? नाऱ्या०—मला काय ठावें. आं०—अरे कोण आहे? मु०—आबे हाम मुझाफर. ना०—बाबा मु-शाफर मुशाफर!! आं०—हित कशाला आला आहे? मु०—आबे हमारा रुपयेका खीसा दे. आं०—नाऱ्या याला धक्का मारून हांकून दे. ( मुशाफरानें पाटलास सांगावें ) मु०—पटेल सलाम है. पाटील०—तुह्मी कोण आहां? मु०—हाम मुशाफर हैं, तुह्मारे गांवमें धर्मशाला है, वो धर्मशालामें हाम उतरेथे, और ये आंधे बी व्हां बैठे थे; ये आंधेके पास हाम हामारे कपडे और रुपयेका खीसा रखा और हाम न्हानेकूं गया, फिर आके आंधेके पास खीसा मंगने लगा तो देता नहीं और गाली देता और सब आंधे मारने लगे. आब तुम मेहेरबानी करके आंधेके पाससे हमारा खीसा दिलाव. पा० बरें आहे, तुह्मी येथें बसा. पा०—अरे आंधळ्या, ह्या मुशाफ-राचा खिसा घेतलास तो दे. आं०—पाटीलबाबा आह्मीं आंधळे, अह्माला खिसा कसा असतो तो माहीत नाहीं. पा०—कांरे खिसा रुपयांचा. आं०—रुपया कसा असतो? पा०—रुपया चांदीचा. आं०—चांदी कसी असते? पा०—पांढरी स-फेत. आं०—पांढरे कसें असतें? पा०—बगळ्यासारखें. आं०—बगळा

कसा असतो ? पा०—हा पहा बगळा. आं०—आबा! बा! बाबा! नाऱ्या हा पहा बगळा. ना०—पाटील हें काय ? पा०—त्याची चोंचुंच. ना०—विठ्या ही चुंच पाहा. वि०—अरे आपली ताई कुठ गेली? ताई ! ताई ! [ गोंगाट करावा ] पा०—आंधळ्या-हो तुह्मीं जा आपल्या मार्गानें. आं०—बरें बाबा जातों. नाऱ्या, विठ्या, चलारे ताई कुठ आहे ? ता० ही मी आहें. आं०—चला जाऊं अधळ्याला दे दाता, गरिबाला दे दाता; कोण भागेवंत दाता आसल, माडीवरून पहात आसल, आं-धळ्याला देत आसल, आंधळ्यागरिबास एक आधेला पैसा पाठीव रामचंद्रा, सदाशिवा. पा०—घे आंधळ्या. आं०—आह्मा दिलें तांब्यांचें तुह्मा देईल सोन्यासुवर्णाचें. केल्या कष्टाला कमाईला बरकत देव ह्मादेव सदाशिवा.

---

## फकीर.



## ॥ पद ॥

धर्म जागो सद्गुरूचा ॥ जो का परोपकारी ॥ आंधळ्या दृष्टी देतो ॥ त्याचें नाम उच्चारी ॥ ध्रु० ॥ पूर्वजन्मीं पाप केलें ॥ तें बा अधिक विस्तारलें ॥ नाशिवंत विषयसुख॥ सेवितां तिमीर कोंदलें॥ चौऱ्यांयशीं लक्ष योनी॥ फिरतां दुःख भोगीलें॥ ज्ञानदृष्टी हारपली ॥ दोन्ही नेत्र आंधळे ॥ धर्म० ॥ १ ॥ संसार दुःखमूळ ॥ चहूंकडे विंगळ ॥ विश्रांती नाहिं कोठें ॥ रात्रंदिवस तळमळ ॥ काम क्रोध लोभ शून्य ॥ पाठीं लागले वोंगळ ॥ कवणा आतां शरण जाऊं ॥ दृष्टी देईल निर्मळ ॥ धर्म० ॥ २ ॥

# सोंग २७ वें.

## फकीराचें.

[ फकीराचें सोंग आणतेवेळेस पाक ( स्वच्छ ) असावें. ]

## ॥ दोहरा ॥

दीन पांचकी है जीनगी; करले खुदाकी बंदगी ॥
नहींतो बडी शरमंदगी, गफलत छोड हुशार रहो ? बिसमिल्ला रहिमान रहीम. प्र०—केव पटेल वस्ती अल्लाकी ? उ०—

सांई बस्ती अल्लाकी. प्र०—इस बस्तीमें कोई फकीर कुच महेजद है ? उ०—सांईजी महेजद है, उस महेजदमें ठेरो. प्र०—सुन पटेल हमकूं थोडा सामान दिलाव. उ०—सांईजी आपकूं क्या सामान चाहिये ? प्र०—१ मण गांज्या, सवामण सुका, दो घडे पाणीके और एक मण लकडी जलदी लेकर आव. उ०—सांई ये सामान कायकू चहिये ? उ०—कोई आवलिया, कोई फकीर आयेगा उनकूं हुक्का पिलानेकू चाहिये. उ०—आच्छा, ये लेव.

# दोहरा.

जिनें आपकूं जोया नहीं, तनमनसे खोया नहीं ॥ मनमैलकूं धोया नहीं, अंघोल किया तो क्या हुवा ॥ १ ॥

॥ बतावणी नक्कल ॥ केव पटेल? बस्ती अल्लाकी. उ०—अल्लाकी. प्र०—इस बस्तीमें कोई फकीरका मकान है ? उ०—सब कुच है. प्र०—सांईजी आलेकम् सलाम ( नक्कल ) उ०—बाबा रामराम. प्र०—तुम फकीर है? उ०—तुला कसा दिसला? प्र०—तेरी जबान केव तेडी पडती है ? उ०—नवा फकीर झालों तो जरा जरा तेडी पडती है ? प्र०—कुच मुसलमानी घर यादहै ? उ०—याद है. प्र०—जुबाब बोल. उ०—सीधे रस्तेसे जाना और बडी बू करके हाक मारना; ये मुसलमानी घर

याद है. प्र०—सांईजी, तनका झाडा याद है ? उ०—याद है. प्र०—जुबाब बोल. उ०—बडी फजर उठना और झाडा करके आना ये झाडा याद है.प्र०—सांईजी कुरान याद है? उ०—याद है. प्र०—जुबाब बोल?उ०—कुरान कुच जंगलमें आया नहीं जरा जरा घास आया सोबी काट लिया. प्र०—तुजकूं निमाज याद है ? उ०—याद है. प्र०—जुबाब बोल. उ०—चार आणेके पैसे लगते हैं. प्र०—तुज फात्या याद है? उ०—याद है. प्र०—जुबाब बोल. उ०—आबल फात्या ! ! बकल खात्या! सीकल खात्या ! तुम खात्या और हमकूबी देत्या!! प्र०—वाहवा! तुजकू मुरश-दकी याद है ? उ०—याद है. प्र०—तेरे मुरशदनें प्याला पि-लाया सो क्या कहेके पिलाया ? उ०—येवढा मोठा मडका लाया, उसमे ताक भऱ्या ! हलाहलाकर पिलाया ! जो पल्या तो ममादेवीच्या रस्तेपर दल्या, पाय निसऱ्या, मडका फु-ट्या ! रामराम सांग्या ! लोणचें मांग्या ! ! प्र०—वाहवा! तुम मक्का दैखी है ?उ०—मक्का तो देखी. प्र०—केती उंची है?उ०—मेरे सीर बराबर उंची है. प्र०—मक्केका रंगरूप कैसा है. उ०—बडी फजर देखा तो हारी दिखती है ! दुपेरकूं देखा तो सफेत दिखती है ! और सामकूं देखा तो लाल दिखती है ? और उसकू लाल तुरेबी आते हैं ? और बजारमें वेचते हैं ? प्र०—आबे ओतो भुटे? उ०—हाम फकीर झूटे? प्र०—तूनें आल्ला

मिया देखा है ? उ०—आल्लामिया देखा. प्र०—आल्लामिया किसतरेका है ? उ०—आल्लामियाकूं दो हात हैं, दो पांव हैं, दो कान हैं और वो हमारे सात बात करता है. प्र०—वाहवा ! पीछेहाट ॥

॥ नक्कल समाप्त ॥

आरे इस बस्तीमें कोई दूसरा मकानदार है ? उ०—हां मौले, दुसरा मकानदार है.

## ॥ सवाल दोहा ॥

आल्लाने तुजकूं पैदा किया, भलाबुरा बतला दिया ॥ तूं पावेगा आपणा किया, गफलत छोड हुशार रहो ॥ १ ॥

याहिआला; इस्कआला हरजत आप फकीर है ? उ०—सांईजी हाम फकीर हैं. प्र०—फकीरीके मायने याद हैं ? उ०—याद हैं. प्र०—सांईजी आपका इसम क्या कहते ? उ०—हमारा इसम तो मिस्कीशा कहते. प्र०—सांई हमारा इसम पूछा आब आपका इसम क्या कहते ? उ०— हमारा इसम तो कलिंगशा कहते [ न०प्र०—बालके ? उ०—कैंव सांई. प्र०—आपका इसम क्या कहते ? उ०—हमारा इसम तो जब्बरशा कहते ] प्र०—सांई उ०—कैंव मौले. प्र०—आप फकीर हैं ? उ०—मे फकीर है. प्र०—फकीरीके मायने याद हैं ? उ०—याद हैं.

प्र०—चारो पैगंबर याद हैं ? उ०—याद हैं. प्र०—किस तरेसे याद हैं, सो जुबाब बोल. उ०—सुभान आल्ला ॥ आवल ईसा पैगंबर, दुयम मुसा पैगंबर, सीयम दाउद पैगंबर, चारो पैगंबरनकी महमद सलीलाव जालव मव आलम आलेसा आलेकम सलाम. प्र०—सांई तुम मुसलमीन क्या मुसलमान, किसपर तेरा इमान, कौन तुजे राहा बताई, और कहांसे मुसलमानी पाई, जुबाब बोल. उ०—तन मेरी मुसली, जुबां मेरी मुसलमान, कुरान मर्दनपर मेरा इमान, चारोनें राहा बताई और कलमेसें मुसलमानी पाई. प्र०—सांईजी. उ०—केव मौले. प्र०—तुम फकीर किस रोजके ? उ०—हम फकीर रोजे मेहेशरके. प्र०—रोजे मेहेशर किसे कहते ? उ०—हक्कताल्लेके वायदेकूं. प्र०—हक्कताल्लेके वायदेकी रात कौनसी और दिन कोणसा ? उ०—रात जुंमेरातकी और दिन जुंमेका. प्र०—तुम फकीर किस घडीके ? उ०—हम फकीर बारातास बत्तीस घडीके. प्र०—रोजे मेंशरसे बुंद तुटा सो क्या कहके तुटा, क्या कहके नादल हुवा, क्या कहके जमा हुवा जुबाब बोल. उ०—लायल्लिल्ला कहके तुटा, इलिल्ला कहके नादल हुवा, महमद यारसुलिल्ला कहके जमा हुवा, प्र०—लायल्लिल्ला किने कह्या, ईलिल्ला किने कह्या, महमदया रसुलिल्ला किने कह्या जुबाब बोल ? उ०—लायलिल्ला तननें कह्या, महमदया रसुलि-

ल्हा जुबानें कह्या. प्र०—सांईजी तुम फकीरहो. उ०—हांजी मौले फकीर हैं. प्र०—फकिरी कीसपर उतरी ? उ०—आलेबा सलाम पर उतरी. प्र०—पेटा किसपर उतरा ? उ०—पेटा कलंदरपाछा पर उतरा. प्र०—सांईजी ? उ०—हा मौले. प्र०—लुंगी और बानी किनसे निकली ?उ०—मीराखीळ दिवानसे निकली,प्र०—कटाव और सुमरणी किनसे निकली ? उ०—हासन बसरीसे निकली. प्र०—आलफ और सयली किनसे निकली ? उ०—मौला आल्लीसे निकली. प्र०—सांईजी मौलाआल्ली किनके देखनेवाले ? उ०—ईमाम हुशनके देखनेवाले. प्र०—ईमाम हुशन किनके देखनेवाले ? उ०—आबदल आलफदारके देखनेवाले. प्र०—आबदल आल्फदार किनके देखनेवाले ? उ०—महमदके देखनेवाले. प्र०—महमद किनके देखनेवाले ? उ०—मतलबके देखनेवाले. सांई आप जरा ठेरो [ नकल ] प्र०—बालके ? केव सांई ? आप किनके देखनेवाले उ०—हमतो रामाजी बिन गोमाजी, आपाजी टोपाजी ऐसे बडे बडेके देखनेवाले ! व-हावा ! प्र०—सांईजी! उ०—केव मौले. प्र०—पाछासाहेब किनके देखनेवाले ! उ०—पाछासाहेब सब आलमके देखनेवाले प्र०—सब आलम किनके देखनेवाले ? उ०—कुरान हुशन साहेबके देखनेवाले. प्र०—कुरान हुशन साहेब किनके देखनेवाले?उ०—पैगंबरशाके देखनेवाले. प्र०—पैगंबरशाके चारो कलमे यादहैं ?

उ० याद है. प्र०—जुबाब बोल. उ०—आवल कलमा गरीबशा, दुयम कलमाकी तस्बीप है. महमद कलमेके मायने हैं. चारों फकीरसा कलमा कलमेमों. प्र०—सांईजी, तनका झाडा याद हैं? उ० याद है. प्र०—पांचो इमाम याद हैं.? उ०—याद हैं. प्र०—कोनकोनसे? जुबाब बोल. उ०—आवल मेहेराब तो तन है, दुयम मेहेराब दील है, सीयम मेहेराब इमान है, चारो मेहेराब कान हैं. पांचमें मेहेराब तो फाम है. प्र०— सांईजी! उ०—केव मौले. प्र० आपके तनमों दरगा कोणसी है. उ०—आवल मस्तक तो महेजद है, कान तो काजी है. नेन तो नबी है, नाक तो कबर है, मुखं तो मक्का है, हात तो हजरत हैं, पेट तो दोजक है, कदम तो रसुल हैं. कहे कबीर सुन कमाल येही दरगा कबूल है. प्र०—सांईजी तुमारे तनके बला केत्ते हैं? उ०—तनके बलाई तो पांच हैं. प्र०—कोणकोणसे? जुबाब बोल. उ०—आवल की बलाई मेहरबा है, दुयमकी बलाई फाम है, सियमकी बलाई तो बतुलमामुल है, चौथी बलाई आरसा है, पांचमी बलाई तो खुरशी है. प्र०—सांईजी. उ०—केव मौले. प्र०— दिनदुनियांमेके चारों फकीर याद हैं? उ०—याद हैं. प्र०— जुबाब बोल. उ०—आवल फकीर गरीबशा, दुयम फकीर बाबा आदमसती है, सीयम फकीर नवीयाहुशेन है, लायलिल्ला फकीर मक्केमें है? प्र०—सांईजी. उ०— केव मौले. प्र०—

आल्लामिया कायमें हैं ? उ०—आल्लामिया कुरानमें है. प्र०—तुम कायमें है ? उ०—हाम कलमेमें है. प्र०—कलमा कायमें हैं ? उ०—दीलमें है. प्र०—दील कायमें है. उ०—हाडीमें है. प्र०—हाडीका वजीर कोण है. उ०—धड है. प्र०—धडका मुरशद कोण है. ? उ०—दील है. प्र०—दीलका वजीर कोण है ? उ०—ओंठ है. प्र०—सांईजी. ? उ०—जी मौले प्र०—उपरका ओठ क्या कहता और नीचेका क्या कहता, जुबाब बोल ? उ०—उपरका ओठ लायलिल्ला, इलिल्ला कहता और तलेका ओठ महमदया रसुलिल्ला कहता. प्र०सांईजी आप खाते किनके सात और सोते किनके सात ? उ०—खाते बिसमिल्लाके सात और सोते नबीके कलमेसात. प्र०—सांईजी आप खाना खाते और आपकी मुच्छा क्या खाती ? उ०—हाम खाना खाते और मुच्छा हमारी बला खाती. प्र०—सांईजी दुनयामें मुशाफर कैत्ते हैं ? उ०—दो हैं. प्र०—कोणसे, जुबाब बोल. उ०—चांद और सूरज. प्र०—वो आते किदरसे और जाते किदरसे. उ०—आते अगार बस्तेसे और जाते मगर बस्तेसे. प्र०—सांईजी ? उ०—केव मौले ? प्र०—दिनदुनियामें मेहेजाब केत्ते हैं ? उ०—पांच हैं. प्र०—कोणसे, जुबाब बोल ? उ०—आवल मेहेजाब इमामआजम, दुयम मेहेजाब इमाम शाफी, सीयम मेहेजाब इमाम मलकी, चारो मेहेजाब इमाम आहातली,

पांचम मेहेजाब इमाम आहामतहसली. प्र०-सांई, आपकूं मुसलमान किने बनाया सो जुबाव बोल? उ०-हमकूं मुसलमान कल्मेनें बनाया. प्र०-कल्में केतनें हैं? उ०-कल्मे तो पांच है? प्र०-कौणकौणसे जुबाव बोल? उ०-[येथें पांच कल्मे ह्मणावे.] प्र०-सांईजी दुनयामें फीरीस्ते केत्ते हैं ? उ०-चारहैं. प्र०-कोणकोणसे ? उ०-आब्राही, ईब्राही, खुबराही, नुबराही, ये खुदाके चारो फीरीस्ते हैं. प्र०-सांईजी फकीरी किसपर उतरी? उ०-पंजेतनपर उतरी ? प्र०-पंजे केत्ते हैं. उ०-पांच हैं. ॥

॥ सोंग फकीराचें समाप्त ॥

चाट [ शिंपी ]



# सोंग २८ वें.

## चाटाचें

प्र०—तुह्मी कोण? उ०—आह्मी शिंपी चाटे. प्र०—बगलेंत काय? उ०—गांसोडें. प्र०—यांत काय? उ०—जरतारी पांघुरणें. प्र०—दाखीव. उ० घ्या किंवा नका घेऊं; परंतु पा-

हिल्याचें मोल पडेल. बरें दाखिव. ही बाळंतिणीची आंथरी, हें पोराचें बाळोतें, हे बायकांना चोळखण, हें मुलाचें आंगडें, ही कानटोपी, ही ह्या सोन्याची कुंची, ही पैठणी साडी, हा नागपुरी धोतरजोडा, ही चंदेरी पागडी. बरें बस्स करा ! यांची किंमत काय ? उ०—तुह्माला देववेना आणि मलाही देववेना. प्र०—अहो तुह्मी विकायाला आलां किंवा दाखवाव-यास. आलेत तरी कुठून ?

## ॥ पद ॥

आह्मी आलों चाटे आमचे उदीम मोठे मोठे ॥ धृ० ॥ नि-र्गुणपुरींचा माल भरला माप थाटे राटे ॥ आह्मी० ॥ १ ॥ आफाट होतें चाट झालों भायापट गांसोडें ॥ आह्मी० ॥ २ ॥ कांतेस लावून हिंडतअसे विश्व घडमोडी ॥ आह्मी० ॥ ३ ॥ विश्वपट तिहींलोकीं कोणी घेइनात कोणी॥ आत्मविवेक खरेदी केला सांठविलें आह्मी० ॥ आह्मी० ॥ ४ ॥ खाकनाथ खल्लक झालें, नाम विश्वनाथ ॥ विठ्ठलनाथ विचारी भरले, हेंचि न-वल मोठें ॥ आह्मी० ॥ ५ ॥

पंचकर्ण



# सोंग २९ वें.

## पंचकर्णाचें

[ बाणा कानफाट्या जोग्याप्रमाणें घ्यावा ]

### ॥ पद ॥

आलख जागेजी गोरख जागेजु ॥ दुवा लेणा आंबर होणा

जुजु ॥ धृ० ॥ मायाके दरसन आये गोपीचंदाजी ॥ पगकूं लगाय आपण भाला जुजु ॥ आल० ॥ १ ॥ चंदनकी चौकी सुन्नेकी झारीजु ॥ राजा गोपीचंदा न्हाने बैठाजुजु ॥ आल०॥ ॥ २ ॥ बारासो राणी सोलासो सैल्याजु ॥ राजा गोपीचंदा भोगैगा जुजु ॥ आलख० ॥ ३ ॥

॥ सवाल--कोण देससे आये जोगी ॥ कांहा तुह्मारा ठाव ॥ कोण तुह्मारी सात रहेती ॥ कांहा रखोगे पावजी ॥ १ ॥ जबाब--निरंजनसे आये जोगी ॥ धरित्री हमारा ठाव ॥ बभूत हमारे सात रहेगी ॥ पापीके सिरपर रखेंगे पावजी॥२॥ सवाल--कोण तुमारी बेहेण भानजी ॥ कोण तुमारी माता ॥ कोण तुमारे संग चलेगी ॥ कवण करेगी बाता ॥ ३ ॥ जबाब--धरित्री हमारी बेहेण भानजी ॥ धुनी हमारी माता ॥ बभूत हमारे संग चलेगी ॥ रयेण करेगी बाता ॥ ४ ॥

## पद.

उलट पवनमों दरशन लेकर आलख जागेजी ॥ आलख जागे गुरु दत्त गोरख जागेजी ॥ धृ० ॥ अनुहात सिंगी बाजत बाजा ॥ आलख० ॥ १ ॥ दोन्हो दलपर भया सफेता ॥ व्याघ्रांबर कौपीन कडासन ॥ आलख० ॥ २ ॥ येही बानीमें गोपाळनाथ झुलत हैं ॥ आलख० ॥ ३ ॥ प्रश्न--तुह्मने जोग कहांसे लिया ? ॥ उत्तर

## ॥ पद ॥

पंचकर्ण सिद्धांत देखकर मैं जोगण होईजी ॥ सहज सहज-मैं आलख जगाके निर्गुणकूं पाईजी ॥ धृ० ॥ पुराण अठरा षडशास्त्रका भेद मैंने लियाजी ॥ चराचर भुचर अगोचर मैंने बतला जी ॥ पंच० ॥ १ ॥ रुगवेद आथरवेद सब समज लियाजी ॥ भात भातका मेहेर मैं देखा मेरा दिल चाहाया-जी ॥ पंच० ॥ २ ॥ गुरु साहेबकी मेहेर आब तो गोपाळना-थपर होईजी ॥ पंचकर्ण सिद्धांत देखकर मैं जोगन होईजी ॥ ३ ॥ प्रश्न–बोवाजी तुह्मारा मकाण कोणसा ? ॥ उत्तर–

## ॥ पद ॥

चार देशका मकाण यारो मैं देखन जातीथी ॥ स्थूल सूक्ष्म कारण देह महाकारणकी बसती थीजी ॥ अकार उकार मकार अर्ध मात्रा सुन लेतीथीजी ॥ लिंगदेहसे भया सफेता कोईनहीं साथीजी ॥ प्रश्न–तुह्मारे कानोंमें क्या झुलता? उत्तर

## ॥ पद ॥

ग्यान ध्यानकी मुद्रा मेरे कानोंमें झुलतीजी ॥ अनुहात किंगरी हातमों निंद नहीं आतीजी ॥ चार देहका भसम छोड-के उन्मनीसे सोतीथी ॥ ग्यानध्यान० ॥ १ ॥ निरगुन तुंबा

लिया हातमों आलख जगाती ॥ गोपाळ सकूजी कहेश्या मेरेऊपर कोई नहीं साती ॥ ग्यान ध्यानकी० ॥ २ ॥
प्रश्न—तुमारा गुरू कोणसा ?
उत्तर—

## पद

गुरु साहेब मेरा बडा अवलिया उने खूब कियाजी ॥ काला पीला सफेत नीला सोही बतलाया ॥ कहीं किंगरी उसका आवाज आवडी भरपाया ॥ जोगन पदकी पाई मुजकूं येही नाम रहगया ॥ कहे सावजी मल्लापा सुनो मेरे धनजी दगडुभाई ॥ मरके सात कोई नहीं गया ॥ अवलिया उने खूब किया ॥ १ ॥

## शेवटील पद.

जोगी भई जोगी हाम जल्मके उदासी ॥ भई निरंजन बासी ॥ हा निरंजन बासी ॥ धृ० ॥ सुंना चांदी आधेला पैसा हम कुच नहीं चाहाते ॥ प्रेमकटोरा लेव मोरे भाई हरदम रमते ॥ हा हा निरंजनवासी० ॥ १ ॥ सिरफोड जमले हमसे मागनवाला न्यारा ॥ केशवदास शिवदिन बोले येतो चरनके रहिवासी ॥ निरंजनवासी० ॥ २ ॥

पांगुळ.



# सोंग ३० वें.

## पांगुळांचें.

विठुजी रायाचें दाण आलरे;दाण आलरे; पंढरीच्या विठो-बाला, देहुमधीं तुकारामाला, आळंदीचे ज्ञानोबाला, पुन्याचे पर्वतीला,आवंढ्याचे नागनाथाला,परळी वैजनाथाला, सिंगना-पुरी महादेवाला, आयोध्येच्या रामचंद्राला, जेजूरीच्या खंडोबाला, हर हर हर हर महादेव ॥ पुंण्याचे पार बांधावे, पांचाचे पंचवीस व्हावे, वेल मांडवाला जावा, अरे रामाघरीं जानकी, पांडवाघरीं द्रौपदी, रावणाघरीं मंदोदरी, गौतमाघरीं अहिल्या, हरिश्चंद्राघरीं तारामती ॥ कोणी ग्यानोबाचा सेवक असल, कोणी तुकारामस्वामीचा भक्त असल, अरे सत्य बोलणें त्या धर्माचें, संधान त्या अर्जु-नाचें, चांगुलपण नकुळाचें, उंची त्या गगनाची, खोली त्या समुद्राची, पत्र तें बेलाचें, माळ ती तुळसीची, व्रत सोमवाराचें, एक व्रत एकादशीचें, शोभा त्या रंभेची, अरे ररर दान आलेंरे दान आलेंरे, ढवळे गंगला, बाणगंगला, पेन गंगला, काशी बनारसेला, अरे भागीरथीच्या नांव, चंद्रभागेला पावलें, अरे सदाशिवाच्या नांव, कोणी सत्वाची चांगुणा असल.

# पद

पांगुळ झालों देवा ॥ नाहीं हात ना पाय॥ बैसलों जयावरी ॥ सौराट तें जाय ॥ खेटता कूपकाठीं ॥ खुंट दरडी नाना पाहे॥ आधार नाहीं कोणी ॥ मज बाप ना माय ॥ १ ॥ दाते हो दान करा ॥ जातों पंढरपुरा ॥ न्यावें मज तेथवरी ॥ दाखवा दीनाचा सोईरा ॥ ध्रु० ॥ हिंडतां गव्हाणें गा ॥ शिणलों येरझारीं ॥ न मिळेच दाता कोणी ॥ जन्मदुःख निवारी ॥ कीर्ती हे संतांमुखीं ॥ तो मज दावा हरी ॥ पांगुळया पाय देतो ॥ नांदे पंढरपुरीं ॥ २ ॥ या पोटाकारणें गा ॥ झालों पांगुळा जना ॥ नसेची मायबाप ॥ भिके नाहीं खंडणा ॥ पुढारा ह्मणती एक ॥ तया नाहीं करुणा ॥ श्वान हें लागे पाठीं ॥ आशा तृष्णा दारुणा ॥ ३ ॥ काय मी चुकलों गा॥ मागें नेणवची कांहीं ॥ नकळेची पाप पुण्य ॥ तेथें आठवच नाहीं ॥ मी माझें भुललोंगा ॥ दीप पतंगा साई ॥ द्या मज जीवदान ॥ संत महा अनुभव कांहीं ॥ ४ ॥ दुरोनी आलों मी गा ॥ दुःख झालें दारुण ॥ यावया येथवरी ॥ होतें हेंचि कारण ॥ दुर्लभ भेटी तुझा ॥ पाई झालें दर्शन ॥ विनवितो तुका संतां ॥ दोन्ही कर जोडून ॥ ५ ॥

सदाशिवाच्या नांव, कोणी भाग्यवंताची सून असल, सासु सासऱ्याचा उद्धार, बेचाळीस कुळांचा उद्धार, भाईबंदाची जोडी सलामत, पांचाचे पन्नास व्हावे, दोन्ही कुळयांचा उद्धार, सदाशिवाचा भक्त असेल.

सोंग पांगुळाचें समाप्त.

